हास्य संगीत

# सैतानी संक्रांत

लेखक

श्री. विनायक रामचंद्र चौगुले

प्रकाशक

गणेश महादेव आणि कंपनी
गिरगांव रोड, मुंबई

सप्टेंबर, १९२४

किंमत एक रुपया

# अर्पण-पत्रिका

दिवंगत झालेल्या मातेच्या दिव्य आत्म्यास संगीत मालेंतील हें पहिलें पुष्प प्रेमातिशयानें अर्पण करीत आहे.

—ग्रंथकर्ता

# प्रस्तावना.

प्रजेचा संतोष हीच राजांची खरी शक्ति आहे, व राजा हा प्रजेचा पालनकर्ता पिता आहे, या राजधर्माचा बुद्धिपुरस्सर त्याग करून, प्रजेकडून स्वसंतोषानें दिल्या गेलेल्या सत्तेचा उपयोग स्वतःची स्वार्थी व अमर्यादित महत्वाकांक्षा पूर्ण करण्याचे कामीं जेव्हां राजेलोकांकडून निर्दयपणें केला जातो, तेव्हां राजा हा प्रजाहितदक्ष पिता वाटण्याऐवजीं एक सैतानी-संक्रांतच कशी होऊन बसते, आणि अशा वेळीं हालअपेष्टांनीं त्रस्त झालेल्या प्रजेचा क्षोभ असल्या राजांच्या रक्तामांसांत शिरून, त्यांच्या सैतानी सत्तेला झुगारून देण्यास कसा कारणीभूत होतो, हें दर्शविण्याकरितां, मानसिंग व जयसिंग या पितापुत्रांची, व स्वामी, दिवाणजी व गरीब प्रजाजन वगैरे पात्रांची योजना प्रस्तुत नाटकांत केली आहे. मानसिंगाच्या वैषयिक चैनीचा आदर्श म्हणून, मनोरमा, खांसाहेब, शंकरराव व दुर्गादास वगैरे हास्यरसोत्पादक पात्रांचा व राजकीय हेतूखालीं दडवलेली पापी चैन दर्शविण्यासाठीं, रोहिणी, दीपसिंग यांचा उपयोग केला आहे.

वरील हेतु कितपत साध्य झाला आहे, हें सहृदय प्रेक्षकांवरच सोपविणें इष्ट आहे.

स्वतःचे इच्छित हेतु साधण्याकरितां, नाटककार या दृष्टीनें पुढें येणें किती कष्टप्रद आहे, हें निराळें सांगावयास पाहिजे असें नाहीं. परंतु मनोहर स्त्री संगीत मंडळीचे गुणग्राही व उत्साही मालक श्री. रा. अण्णासाहेब चिवटे यांनीं स्वतः परिश्रम घेऊन जें मला अमोल सहाय्य केलें, व नाटक बसवितेवेळीं कंपनींतील नटवर्गानीं आपलेपणानें जी मेहनत घेतली, त्याबद्दल मी अत्यंत आभारी आहें, त्याचप्रमाणें पुस्तक इतक्या जलदीनें प्रसिद्ध केल्याबद्दल गणेश महादेव आ० कंपनीचे श्री. वीरकर यांचा मी अत्यंत ऋणी आहें.

जळगांव, पू० खानदेश, भाद्रपद शु० १४ श० १८४६ — सर्वांचा कृपाभिलाषी, वि. रा. चौगुले.

याच ग्रंथकर्त्यांचीं

# सरता संसार

( सामाजिक )

व

# सोनेरी सलाम

( ऐतिहासिक )

## हीं नाटकें

लवकरच रंगभूमीवर येतील.

## गणेश महादेव आणि कंपनीचीं

# आजकालचीं पुस्तकें

| | | |
|---|---|---|
| १ | स्वराज्याचा श्रीगणेशा. | २-४-० |
| २ | स्वराज्याची घटना. | २-४-० |
| ३ | स्वराज्याची स्थापना. | २-४-० |
| ४ | स्वराज्याचा कारभार. | २-४-० |
| ५ | स्वराज्यावरील संकट. | २-४-० |
| ६ | मराठी रियासत, मध्य वि. ३ | २-४-० |
| ७ | ब्रिटिश रियासत, पूर्वार्ध. | ३-८-० |
| ८ | श्रीएकनाथ चरित्र. | ०-१२-० |
| ९ | भक्तिमणिमाला. | १-८-० |
| १० | अजिंक्य तारा. | १-८-० |
| ११ | निकोलाय लेनिन. | ०-१२-० |
| १२ | ग्रेट ब्रिटनची शासनपद्धति. | ०-१०-० |
| १३ | नवजीवन ( नाटक ) | ०-१०-० |
| १४ | जोसेफ मॅझिनी. | २-०-० |
| १५ | महात्मा गांधी. | २-४-० |
| १६ | मानवी कर्तव्यें. | १-०-० |
| १७ | माधवानुज ( कविता ) | २-०-० |
| १८ | वीर वैरागी | १-०-० |
| १९ | गोमांतक ( ऐ. काव्य ) | २-०-० |
| २० | श्री. चापेकरांचे निवडक लेख | २-८-० |
| २१ | सैतानी-संक्रांत. ( नाटक ) | १-०-० |
| २२ | शृंगेरीची लक्ष्मी. | २-०-० |
| २३ | कुठें ? | १-०-० |

॥ श्री ॥

# सैतानी-संक्रांत

## अंक १ ला.

### प्रवेश १ ला.

**नांदी**--(राग—भूप—ताल—रुपक. )

**भार होई भारत शिरीं; नय होई कसा वैरी ? ॥धृ०॥**
**राष्ट्रा संक्रांत काल । ग्रासि करी हाल । तारीं जन हो**
**या काला ॥ १ ॥ आकांक्षा करित बाल । वेडे मम**
**बोल । साह्य जन हो, या काला ॥ धृ० ॥ २ ॥**

[ **स्थळ**—विजयनगर—बागेच्या रस्त्यावर दुर्गादास प्रवेश करतो. ]

**दुर्गादासः**—( स्व. ) आसपासच्या टापूंतील, साऱ्या राजेरजवाड्यांनीं आमच्या मानसिंग महाराजांचं, सार्वभौमत्व, कबूल केल्या कारणाप्रीत्यर्थ आजचा दिवस आनंदानं साजरा करावा, अशा तऱ्हेचा दरबारी हुकूम सुटला, व त्या हुकमाची अंमलबजावणी, आपआपल्यापरीनं प्रत्येकजण करण्याचा प्रयत्नही करीत आहे. आनंदोत्सवाप्रीत्यर्थ दरबार भरला, मान मरातब, पदव्या, जहागिरी, वगैरे गोष्टींची मारे खैरात केली, पण एवढं सारं कुणाला ! तर महाराजांच्या फक्त बगलबच्यांनाच ! आम्हीं मात्र शिळ्या तुकड्यावरच भागलों गेलों ! दरबारच्या खाशा मंडळींची खरो-खरच चंगळ उडाली. ( पाहून ) पण हे कोण ? आणि हातावर हात मारून, अगदीं मोठमोठ्यानें खिदळत येत आहेत ! हू ! वाटलंच मला तें !

शंकरराव आणि खांसाहेब ! आपल्या मानसिंग महाराजांना, दररोज नवीन पाखरं गाठून देणारे, हे दोन दलाल जोंपर्यंत जिवंत आहेत, तोंपर्यंत या विजयनगरांत कोणत्या सभ्य स्त्रीवर वेळेवर कोणता प्रसंग येईल याचा मुळींच नेम नाहीं· ( शंकरराव व खांसाहेब, हातावर हात मारीत हंसत हंसत प्रवेश करतात. )

**शंकरराव**:—कांहीं म्हणा खांसाहेब, तुम्हींच म्हणून तिला तेथून उडवून महाराजांपुढं दाखल केलीत; इतरांचं डोकं इतकं खास चाललं नसतं.

**खांसाहेब**:—अरे यार, इदर का उदर, उदर का इदर, करनाहि पडता है; नहिं तो, कौन पुछेंगा हम लोगोनको !

**दुर्गादास**:—( स्व. ) बस्; एवढ्याच करितां हरामखोर जन्माला जसे आले आहेत ! या हिरव्या महालांतलं पाखरूं, आज त्या हवेलींत गेलं; आज तिकडन्चं पाखरूं महाराजाकडं दाखल केलं; या विषयांखेरीज या बदमाशांच्या तोंडून दुसरं तिसरं कांहीं निघेल, तर जसं कुळाचं ब्रीद जाईल अगदीं.

**खांसाहेब**:—( पाहून ) ओ, हो, हो ! दुर्गादास ! तुम क्यों ऐसे इदर गुपचुप खडे हुवे है ? ध्यान कररहे है क्या, किस परीकां ! ह्यः ! ह्यः ! दिखताहि है वह अंदाज !

**शंकरराव**:—( स्व. ) हे अजागळ काय परीचं ध्यान करणार म्हणा ! घरची तर प्यारी म्हणावं अगोदर नीट संभाळ ! मोठ्या हौशीनं लेकानं या वयांत लग्न केलं, पण बायको तर अशी चवचालचांदणी मिळाली आहे, कीं भर बाजारांत याची अब्रू घ्यायला मागंपुढं पहायची नाहीं. ( उघड ) अरे, पण ते पहा, धाकटे सरकार, अगदीं सड्यास्वारीनिशी इकडंच येत आहेत, बहुतेक पलीकडल्या बागेंतच जात असतील. अहो दुर्गादास, महाराज येताक्षणींच जयजयकार करूं या; आणि मग थोरल्या महाराजांकडे, हजरी द्यायला जाऊं या. ( जयसिंग प्रवेश करतो. तिघे "सरकारचा जयजयकार असो." एवढं म्हणून मुजरे करून जातात. )

( पुढील सीन—बाग ).

**जयसिंगः**—( स्व. ) शेवटीं बाबांच्याच गळ्यांत विजयश्रीनं माळ घातली, आणि माझे बाबा आतां सार्वभौम झाले. बाबांसारख्या प्रेमळ पुरुषाची कारकीर्द, प्रजेला आतां सुखावह झाल्यावांचून राहणार नाहीं. सार्वभौम पदाचा मान बाबांना मिळाला हें पाहून, मन कसं अगदीं आनंदानं वेडं झालं आहे. यावेळीं सारी सृष्टि अगदीं प्रेममय भासून, प्रेमच साऱ्या दुनियेचा नियंता आहे असं वाटायला लागतं—खरोखर—

**चाल**—( आला जो मज. )

**आतां ही मज भासे दुनिया; प्रेम दिसे दुनियेचा यंता ॥ धृ० ॥ भ्रमर भ्रमला; प्रेमांत विरला । ही कमलिनी नच सोडी तयाला ॥ १ ॥**

त्या पहा, सुंदर पुष्पांच्या नाजुक वेली सात्विक प्रणयाच्या तंद्रींत अगदीं एकरूप होऊन, वृक्षांना कशा अगदीं गाढ आलिंगन देत आहेत. अहाहा ! जिकडं तिकडं अगदीं आनंदी आनंद ! सृष्टीच्या या मोहक वातावरणांतील गोड लहरींबरोबर; मनुष्याचा आत्मा जर कांहीं काल तरंगू लागला तर त्यांत काय नवल ? अहाहा ! ( तन्मय होतो. दिवाणजी प्र. क. )

**दिवाणजीः**—( स्व. ) सद्‌गुणाचा पुतळा खरा, पण अतिशय भोळा ! बापानं या पोराच्या जिवावर सगळीकडं विजय संपादन केला, आणि स्वतः मोठ्या थाटानं सार्वभौम किताब जोडून आपण अगदीं मनमुराद विलास भोगित राहिला. वारे मानसिंग महाराज ! सैताना, तुझ्या गोड शब्दांच्या जादूला हा तुझा भोळा पोरगा बळी पडला, आणि म्हणूनच या विजयनगरांत तूं आतां स्वैर सुटलास ! अरेरे ! काय हा पित्यावर अंधविश्वास ! मायावी शब्दांचा कर्णमधुर आवाज याच्या कानीं रात्रंदिवस घुमविण्याचा प्रयत्न, याचा सैतानी बाप सारखा करीत असतांना, दीनप्रजेच्या करुण किंकाळ्या याला ऐकूं तरी कशा येणार ! सैतानी पित्यावर अंधविश्वास

ठेवणाऱ्या राजपुत्रा, तुझी समजूत तरी मी आतां कशी करूं ? स्वामींच्या म्हणण्याप्रमाणं, याचं मन वळविण्याचा आजचा हा शेवटचाच प्रयत्न करून पहातों. पण अद्याप हे आपल्या सुखमय विचारांच्या तंद्रींतच आहेत. थोडा वेळ थांबल्याशिवाय गत्यंतर नाहीं.

**जयसिंगः**—( मागें वळून पाहून ) कोण दिवाणजी ? यावेळीं इकडं कुणीकडं ? आणि आजच्या या आनंदाच्या प्रसंगीं तुम्हीं असे खिन्नवदन कां ?

**दिवाणजीः**—तेंच सांगण्याकरितां, आज हा आपला बंदा नौकर आपल्या चरणाशीं आलेला आहे.

**जयसिंगः**—बोला, दिवाणजी, अगदीं मनमोकळेपणानं बोला.

**दिवाणजीः**—सरकारनं आश्वासन दिलं, आतां अगदीं मनमोकळेपणानं बोलतो. सरकार, आपल्या वडिलांना सार्वभौमत्व मिळालं, व त्याप्रीत्यर्थ दरबार सुद्धां थाटानं पार पडला. दरबारी हुकुमाप्रमाणं नगरांतील साऱ्या लोकांनीं तो दिवस साजरा करायचा प्रयत्नहि केला. पण सरकार, प्रजाजनांचं अंतःकरण खरोखरच का बाह्यांगाइतकं प्रफुल्लित होतं ?

**जयसिंगः**—( आश्चर्यानें ) दिवाणजी, असला अनपेक्षित प्रश्न अशा आनंदाच्या प्रसंगीं तुम्हीं मला कां विचारीत अहांत ? प्रजेच्या पालनकर्त्यांची जबाबदारी शिरावर बाळगणारे माझे बाबा, जर मला अंतरबाह्य अगदीं आनंदीत दिसत आहेत, त्या अर्थीं प्रजासुद्धां कां नसावी ?

**दिवाणजीः**—( स्व. ) भोळ्या जिवाची काय वेडी समजूत आहे पहा ! ( उघड ) सरकार, स्पष्टोक्तीचं साहस करीत आहे, याबद्दल क्षमा करा. आज आपल्या वडीलांची, व खुद्द माझ्या अन्नदात्याची निंदा करण्याचं साहस मला अगदीं नाईलाजानं करावं लागत आहे. आपल्या गादीबद्दल मला किती अभिमान आहे, त्याची साक्ष हे माझे पांढरे केंस आपल्याला देऊं शकतील. मानसिंगमहाराजांचं स्वैर वर्तन——

**जयसिंगः**—( दचकून आश्चर्यानें ) काय स्वैरवर्तन ? स्वैरवर्तन हा शब्द माझ्याच विश्वासांतील व्यक्ति उच्चारण्याचं धाडस करीत आहे कां ?

**दिवाणजीः**--आपल्या विश्वासांतील तीच स्वार्थशून्य व्यक्ति हा शब्द उच्चारण्याचं धाडस अगदीं नाईलाजानं करीत आहे. स्वैर वर्तनासारख्या शब्दानं, आपल्या वडिलांचं नांव माझ्याकडून सुशोभित केलं जातं ना जातं तोंच आपल्या कोंवळ्या अंतःकरणावर, अगदीं रसरशीत निखारे ठेवल्याचा आपल्याला भास झाला असेल. पण सरकार, ज्या आयाबहिर्णींना, त्या वर्तनाच्या दृश्य स्वरूपाच्या वणव्यांत, रात्रंदिवस होरपळून जाण्याचे प्रसंग येतात, त्या राष्ट्रांतल्या केंविलवाण्या जिवांनीं, आपल्या इज्जतीच्या रक्षणाकरितां, जर आपल्या सदय अंतःकरणाच्या मदतीची अपेक्षा केली तर ती अस्थानीं होईल का ? सरकार, सत्याकरितां देहाचे दोन तुकडे झाले तरी बेहेत्तर, पण सैतानी सत्तेनं होत असलेला सत्याचा खून, आतां यापुढं या डोळयांनीं पहाणं अगदीं अशक्य आहे.

**जयसिंगः**--( रागानें ) दिवाणजी—

**पद**—( राग–केदार–ताल. )

**तव बोल हृदीं खोल । क्षत पाडी अजि–हा ॥ धृ० ॥**
**परि वाटे बिनमोल । मज याच काला ॥ वृथा बोल**
**परिणामीं । घातुक जिवां ॥ कृति दावि मजला । मग**
**बोल बोला ॥ धृ० ॥**

**दिवाणजीः**--( खिन्नस्वरानें ) काय झालं हें ! इतक्या उत्साहानं आलों, आणि कार्याचा शेवट हा असा झाला ! ! ( स्वामी प्र. क. )

**स्वामीः**--राष्ट्रोन्नतीच्या तत्वासाठीं निस्वार्थवृत्तीनं झगडणाऱ्या जीवा, असा निराश होऊं नकोस. निराशेच्या शेवटल्या आशेतील धुगधुगी जोंपर्यंत कायम आहे, तोंपर्यंत तुमच्या सारख्या कर्तृत्ववान पुरुषांनीं आपल्या प्रयत्नांचे धागे असे ढिले सोडून मुळींच चालावयाचें नाहीं. दिवाणजी,

ही सैतानी सत्ता उलथून टाकायला, अगोदर राजमंडळांत फूट पाडायला पाहिजे. राजमंडळांतील कांहीं व्यक्तींचा जयसिंग हा अगदीं जीव का प्राण असल्यामुळं, त्यांच्याच हातून हें कार्य तडीस जायला पाहिजे. आपल्या जोरकस प्रयत्नांनीं, आपल्यालासुद्धां सिंहासनावरची ही व्यक्ती एक क्षणांत दूर करतां येईल. पण दिवाणजी, सैतानी राजमंडळाचा खडक जोंपर्यंत अभेद्य आहे तोंपर्यंत–सिंहासनावरच्या कोणत्याहि व्यक्तीपासून प्रजाजनांना लाभ मिळणं अशक्य आहे. राजमंडळाच्या विषारी वातावरणापासून शक्य तितक्या लौकर जयसिंगाला दूर केला पाहिजे.

**दिवाणजी**:—गुरुमहाराज, या जयसिंगाचा अंधविश्वास उडविण्याची माझ्या अंगांत मुळींच ताकद नाहीं. माझ्या मतें तर आतां बेलाशक एकदिलानं साऱ्या प्रजाजनांनीं धाकदपटशाहीचा अर्ज खुशाल करावा.

**स्वामी**:—अरेरे ! काय भोळी समजूत आहे तुमची ! दिवाणजी, अर्जाचा विचार करण्याइतकी सत्ताधीशाची नीतिमत्ता, जर आज जागृतावस्थेत असती, तर केशरी सडा घालून घेण्याची त्यांची हौस, त्यांनीं दीनजीवांच्या रक्ताच्या सड्यावर कां भागवून घेतली असती ! जा दिवाणजी, तुमचा तरी मी कशाला हिरमोड करूं ? अर्जाचा प्रयत्न करून पहा, आणि निकाल मला मठांत कळवायला या. प्रजेच्या पालनकर्त्यानं जरी दुःखितांची हांक ऐकली नाहीं, तरी परमेश्वर ती हांक न ऐकायला, आजच कांहीं गाढ झोपीं गेलेला नाहीं. दिवाणजी येतों मी आतां. ( दोघेहि निरनिराळ्या दिशेनें जातात. ) ( पडदा )

---

## प्रवेश २ रा.

[ **स्थळ**—दुर्गादासाचें घरः—दुर्गादास प्र. क. ]

**दुर्गादासः**—( स्व. ) या कष्टमय संसारांत, बायकोपासून तरी थोडं सुख मिळेल, या मोठ्या आशेनें या वयांत लग्न केलें. पण बायको अशी मिळाली आहे म्हणतां, कीं दररोज मीच थोबाडींत मारून घेऊन अगदीं

स्वस्थ बसतों ! मी म्हणतो घरांत एक मर्यादा नाहीं तर नाहीं पण निदान बाहेर तरी मर्यादशीलपणा ! नांव नाहीं ! छटेलपणा तर इतका रोमरोमांत भरलेला आहे कीं, ही एकाद्याची घरांतलीच बायको आहे, कां त्याचं ठेवलेलं अंगवस्त्र आहे, हें सुद्धां ओळखण्याची मारामार ! बा, दुर्गादासा धन्य आहे तुझा संसार ! म्हातारपणांतली बायको म्हणून जरा सैल सोडली पण आतां अशी कांहीं वेछुट सुटली आहे म्हणतां; छेः छेः छेः ! टाळकं फिरतं हो विचारानं या ! या शहरांत तरी काय अंधाधुंदी माजलेली आहे पहा ! आमचे थोरले सरकार मानसिंग महाराज, आतां ऐवढे वयोवृद्ध, पण वीस वर्षांच्या तरुणालासुद्धां अजून लाजवतील. महाराजांची स्वारी रस्त्यावरून चालली, म्हणजे बिचाऱ्या सभ्य स्त्रिया, पटापट आपल्या घराचे दरवाजे बंद करून अगदीं आंत बसतात. आमच्याही घराचा दरवाजा माझ्या धाकानं लावला जातो म्हणा, पण कोपऱ्यांतली, खिडकी मात्र उघडी असते हो ! जाऊन द्या, नसते विचार या थकलेल्या वेळीं नकोत. हीं दरबारचीं पत्रं खरडतां खरडतां, आज या कंबरेचे अगदीं तुकडे झाले आहेत. ( बसतो. ) राणीसरकारांना हांक मारूं कां पाठ चेपायला ? मारतोच हांक. अग, ए—आलीस का जरा इकडं ? ए—काय नाठाळ आहे पहा ? 'ओ' तरी देते आहे का अवदसा ? ( जोरानें हांक मारतो ) बाहेर ये म्हणतो ना ?

[ आंतून " थांबा जरा, एवढी लुगड्याची घडी घालते नी येते. " ] आहे कीं नाहीं मजा ? लुगड्याची घडी घालते आहे, पण इकडं पाठीची माझ्या घडी झाली आहे, त्याचं कांहीं आहे का ? ( पुनः हांक मारतो ) अगोदर ये सांगतों ना ? ( मनोरमा त्रासिक मुद्रेनं प्र. क. )

**मनोरमाः**--हं-कशाला हांक मारलीत ?

**दुर्गादासः**--पण एवढ्या कपाळावर आठ्या कशाला ?

**मनोरमाः**--कां नाहीं मेल्या आठ्या पडायच्या—? जिवाला मेलं कधीं सुख मिळेल तर शपथ !

**दुर्गादासः**--हं ! ( स्व. ) सुख मागते आहे जिवाला ! ( उघड ) आतां, कोणत्या सुखाचा उपभोग घ्यायचा शिल्लक राहिला आहे ? मनोरमे, हा तुझा चवचालपणा चांगला नाहीं हं ! अग आतां लहान का आहेस तूं? आतां तरी नीट सभ्यपणानं वाग. गृहलक्ष्मी कशी असावी, कीं तिऱ्हाईत माणसानं पाहिल्यावर त्याला अगदीं संतोष वाटला पाहिजे.

**मनोरमाः**—मग ? माझ्यापासून कुणालाहो असंतोष वाटला आहे ? जो जो बिचारा या घरांत येतो, तो, तुमच्या या त्रासिक मुद्रेला पाहून त्रासलाच जातो, पण माझ्याकडं पाहून तर तो आनंदित झालाच पाहिजे.

**दुर्गादासः**—माझे आई गंगे, तुझ्या या छटेलपणानं तर सारा गांव सुद्धां तुझ्यावर आनंदित होईल; पण माझी तशी इच्छा नाहीं बरं ! तुझ्या सालस वर्तनानं लोक आनंदित व्हायला पाहिजेत समजलीस ?

**मनोरमाः**—एवढ्याच करितां मला इथं बोलावलीत वाटतं ? पुरे झालं रोजचं रडगाणं.

**दुर्गादासः**—(स्व.) प्रकरण फारच बहकत चाललं आहे. वेळींच लगाम घातला तर ठीक, नाहींतर या दुर्गादासाचे धिंडवडे आहेत मग ठाकठीक ( उघड ) मनोरमे, चल बैस अशी इथं; पाठ चेप पाहूं जरा. ( पाठ चेपायला बसते. )

**मनोरमाः**-( स्व. ) नको ग बाई हा वनवास. शरीर कसं अगदीं बहात्तर रोगांचं माहेरघर झालं आहे; लाकडाचा खोका तरी बरा. ( जोरानं चेपते. )

**दुर्गादासः**-अग, किती जोरानं चेपते आहेस ?

**मनोरमाः**-( उठून ) पुरे झालं बाई आतां. अगबाई, किती संध्याकाळ झाली ती ? मला अजून शंकररावाकडं जाऊन यायचं आहे. भारी बाई आजारी आहे त्यांचा मुलगा. येते हां चटकन जाऊन— ( जाऊं लागते )



दुर्गादासः—या तुझ्या गडे गडे करण्यानींच दिवसेंदिवस तुझा मी गडी होत चाललों आहें.

[ पृष्ठ ९.

**दुर्गादासः**—हं, हं, थांबा जरा. मलाच जायचं आहे शंकररावाकडं आज, तेव्हां बघून येईन त्यांच्या मुलाची प्रकृति. अशा संध्याकाळच्या वेळीं आपण मेहेरबानी करून कुठं बाहेर जात जाऊं नका.

**मनोरमाः**— अहो, पण त्यांच्या बायकोला मी आज येईन म्हणून कबूल केलें आहे ? असं काय बरं करायचं तें ? हो म्हणायचं ना आतां ? होच मुळीं. नेहमीं कसं अगदीं गोडीगुलाबीनं वागायचं गडे, होना ?

**पद—( चाल—**हमसे ना बोलो. )

**गोडी गुलाबीनें राया ॥ धृ० ॥ सांवरोनि घ्यावी**
**जाया ॥ धृ० ॥ घ्या निकटीं दासी । ना कोपें लोटि**
**अशी । शिणली अति ही काया ॥ धृ० ॥**

**दुर्गादासः**—हं दूर सर. तें कांहीं नाहीं. या तुझ्या गडे गडे करण्यानींच दिवसेंदिवस तुझा मी गडी होत चाललों आहे.

**मनोरमाः**— परवानगी द्या नाहीं तर नका देऊं, ही मी त्यांच्याकडं जाणार; तुम्हाला काय होतं, मला चारचौघांत दिवस काढावयाचे आहेत.

**दुर्गादासः**— अस्सं ! इथपर्यंत मजल आली का ?

**मनोरमाः**—मजल कसली आली आहे त्यांत ? मुलगा त्यांचा आजारी आहे, तर जायला नको कीं काय ?

**दुर्गादासः**—बस् ठरलं; आज या बाणीवर तर नाहींच जाऊं देत तुला. थांब, चौदाव्या रत्नाखेरीज वठणीवर यायची नाहींस तूं. दोरखंडानंच बांधून ठेवतों इथं; थांब तूं; जातेस काय ? ( दोरखंड आणायला घरांत जातो. )

**मनोरमाः**—बाई, बाई, बाई; शर्थ झाली आतां यांच्यापुढं. माझ्या आईबापांना, माझ्या योग्यतेचं स्थळ साऱ्या दुनियेंत एवढंच दिसलं कीं काय ? जरा कुठं बाहेर जाण्याचं नांव काढलं कीं पडल्या यांच्या कपाळाला आठ्या. तें कांहीं नाहीं; मी यांची अशी मुळींच प्रत्येक बाबतींत

बांधली जाणार नाहीं. ऐश्वर्य नी सुख, मेलं याच वयांत घ्यायचं नाहीं, तर घ्यायाचं तरी केव्हां ?

—पद— ( चाल—कैशी कटेंगी रतिया. )

**बाई मधुर किती हा प्याला ॥ धृ०॥ सुखकर हृदयाला या ॥ तरुणपणीं नाहीं, आवरत बाई । सौख्य-सुधेचा मोह हा मेला ॥ धृ० ॥ अनुकुल वय बाई, सुचूं दे ना कांहीं । नटविन क्षणीं क्षणीं ही काया ॥**

[ मागल्या दरवाजानें निघून जाते. तो आंतून दोरखंड घेऊन प्र. क. ]

**दुर्गादास**:– ( आंतून ) पहातों कशी बाहेर जातेस ती. अवदसे, अशी लगावतों एक श्रीमुखांत—( बाहेर येऊन पाहून ) अरेरे ! गेली ! आणि कुठून ? काय बेमुर्वत अवदसा आहे पहा. ही अखेर मागल्या दर-वाजानं निसटली अं ? परमेश्वरा, कशाला या दुर्गादासाला जन्माला घात-लंस ? बायकोसुद्धां ताब्यांत राहूं नये अं ? छेः छेः छेः, ही चवचाल बिजली केव्हांतरी माझ्या तोंडाला खात्रीनं काळोखी फासणार. ( दारावर थाप ) कोण आहे ? ( बाहेरून “ अरे मी मी उघड लौकर ” ) अरे पण कोण ? रत्नाकर ? होय खास रत्नाकरच. ( जाऊन त्याला घेऊन येतो. ) किती दिवसांनीं आलास रे ? पण आज इकडं कुणीकडं वाट चुकलास ?

**रत्नाकर**:—मुद्दाम लेका, तुझ्या घरीं. मला अगोदर असं सांग, कीं मनोरमा वहिनी घरांत आहेत का ?

**दुर्गादास**:—नाहीं, आत्तांच बाहेर गेली.

**रत्नाकर**:—अरेरे ! माझा संशय खरोखरच खरा ठरणार तर ?

**दुर्गादास**:—म्हणजे ?

**रत्नाकर**:—दुर्गादासा, असा एकदम रागाऊं नकोस. मी विचारतों त्या त्या प्रश्नांचीं अगोदर नीट उत्तरं दे. तुला एकादा मुसलमान मित्र आहे का ?

**दुर्गादास**:—नाहीं. मुळींच नाहीं.

**रत्नाकर**:—दुर्गादासा, आतां रस्त्यानं येतांना एका मुसलमानाबरोबर मनोरमावहिनीच बोलत असल्याचा भास झाला, काळोखांत तोंडं मात्र बरोबर दिसलीं नाहींत; म्हणून म्हणतों—

**दुर्गादास**:—मनोरमेला मुसलमानाशीं बोलतांना पाहिलीस ? रत्नाकर, अगोदर ती जागा दाखव; अशी थोबलतो अवदसेला—अरेरे—

**रत्नाकर**:—अरे, पण हा संशय आहे नुसता माझा; आणि कदाचित् जरी खरं असलं, तरी मुसलमान तो ओळखीबिळखीचा असेल त्यांच्या—

**दुर्गादास**:—अरे लेका, पण मुसलमानाशीं माझ्या बायकोची ओळख ? अरे ! काय करूं रे ! चल हो पुढं तूं आधीं.

**रत्नाकर**:—अरे, पण रस्त्यानं असा उघडा बोडखा का येणार तूं ? टोपी तरी घाल कीं डोक्यावर.

**दुर्गादास**:—रत्नाकरा, रत्नाकरा, कसली टोपी आणि कसलं काय रे ! अवदसेनं चांगलीच टोपी मला घातली रे—अरेरे—

( हातांत सोटा घेऊन; हातपाय आपटीत जातो. )—पडदा

---

## प्रवेश ३ रा.

[ **स्थळ**—राजा मानसिंग याचा महाल. मानसिंग प्रवेश करतो ]

**मानसिंग**:—( स्वगत ) दरिद्र्यांची दृष्टि तरी किती दरिद्री असते पहा. हं: ! बुद्धीच्या आणि पराक्रमाच्या जोरावरच गजांतलक्ष्मी पायाशीं लोळण घालीत असते, या तत्वाची जाणीव, या हरामखोर लोकांच्या अंतःकरणांत पूर्ण बिंबली असतांना सुद्धां, या कपाळकरंट्यांच्या दृष्टीला आमची सौख्य मय सृष्टि अगदीं कष्टप्रद वाटत असते. पण या दरिद्री कुत्र्यांच्या भुंकण्याचा अर्थ समजावून घेण्याकरितां, जर मी माझ्या बुद्धिमत्तेचा असा अपव्यय

करीत सुटलों तर, राजकारणांतल्या रहस्यांचे जिवाच्या मोलाचे लगाम ढिले पडून, एकादवेळीं माझ्याच गळ्याला फांस बसायचा. जाऊं दे. पण हा खांसाहेब कसा अद्याप आला नाहीं ? या असल्या हलक्या दर्जाच्या माणसांची, मला माझ्या कामापुरती तरी पर्वा करणं भाग पडतं. ( कोचावर बसतो. खांसाहेब तंबोरा घेऊन प्रवेश करतो. )

**खांसाहेबः**—:—( लवून मुजरा करून ) आदाब अर्ज हुजुर.

**मानसिंगः**—क्यों ? आज अकेलेहि ? तुम्हारी संगत कहां गयी ?

**खांसाहेबः**—सरकार, चंद्रकला आज कमी होती, तो मैं—

**मानसिंगः**--तो, क्या हुवा चंद्रकलाको ?

**खांसाहेबः**--( स्वगत ) चंद्रकला तो भाग गई; अब क्या कहूं सरकारको ? हां; हां; चंद्रकला मरगई ऐसीहि थाप उडाताहूं ( उघड ) हं ! खुदाकी मर्जी ! !

**मानसिंगः**—खुदाकी मर्जी ? क्या खुदाकी मर्जी ? मरगई क्या ?

**खांसाहेबः**—( हळुंच ) जी हुजुर. मगर बंदे को हुक्म होता हो, तो एखाद चीज—( तंबोरा छेडतो. )

**मानसिंगः**—( रागानें ) बस् बंद. खांसाहेब, खाली चीजे सुननेसें मुझे मतलब नाहीं; बहोत जल्द वह चीज चाही है; बिलकुल नौजवान—

**खांसाहेबः**—जी हुजुर; लेकीन कुछ मुदतकी जरुरत है. चारहि रोजमें बंदा आपके खिदमतमें हाजीर होगा.

**मानसिंगः**—अच्छा जाव; मगर बहोत जल्द.

**खांसाहेबः**—( जातां जातां; स्वगत. ) अब ऐसी नौजवान परी लाता हूं, के महाराज देखते बराबर खूष हो जाय. ( जातो. )

**दिवाणजीः**—( अर्ज घेऊन प्रवेश करतो. )

**मानसिंगः**—या दिवाणजी. काय आहे दरबारची हालहवाल ?

**दिवाणजीः**—दरबारची हालहवाल अगदीं ठीक आहे. पण सरकार,

प्रजाजनांच्या कांहीं प्रमुख पुढाऱ्यांकडून हा अर्ज आला आहे. परवाच्या दरबारांतच ते हा अर्ज दाखल करणार होते; पण मीच त्यावेळीं त्यांना प्रतिबंध केला.

**मानसिंगः**—त्या दिवशीं प्रतिबंध केलात, ठीक केलंत. काय म्हणणं आहे या लोकांचं ? ( अर्ज वाचतो. )

**दिवाणजीः**—( स्वगत ) अर्जाचं महत्व दर्शविण्याचा जर मी यावेळीं प्रयत्न केला, तर ही संशयी स्वारी, माझा संशय घेतल्यावांचून राहणार नाहीं. पाहूं या काय होतं आहे तें.

**मानसिंगः**—( स्वगत ) हंः ! अगदींच बेअक्कल. या थेरड्याच्या मनाचा जरा ठाव घेऊन, याला या क्षणींच येथून घालवला पाहिजे. ( उघड ) दिवाणजी, या अर्जाबद्दल काय करावंसं तुम्हाला वाटतं ?

**दिवाणजीः**—( स्वगत ) अस्सं. लोकपक्षाला मी सामील आहे कीं नाहीं, हें ताडून बघण्याकरितां, राजेश्रींनीं हा प्रश्न टाकलेला दिसतो आहे; पण मीहि म्हणावं तितकाच सावध आहे. ( उघड ) सरकार राजकारणांतील या नाजुक गोष्टींत मला आपल्यापुढं कितीसं कळणार ? आपण सांगाल तसं करायला हा दास तयार आहे.

**मानसिंग:**—ठीक आहे. अर्जाचा विचार करण्यांत येईल, एवढं उलट लिहून कळवा म्हणजे झालं.

**दिवाणजीः**—आज्ञा सरकार. ( स्वगत ) अरेरे ! गरीब बिचारी प्रजा आणखी किती गांजली जाणार ! ( मुजरा करून जातो. )

**मानसिंगः**—( हंसून ) हंः ! नेभळट पुढाऱ्यांचा हा अर्ज, नुसता वाचायला सुद्धां महाग आहे. वेड्या पीरांनों, तुमचे ईश्वरदत्त हक्क, या मानी मानसिंगानं, आपल्या पराक्रमाच्या जोरावर, तुमच्या डोळ्यांदेखत हिरावून घेतले, ते जर परत देण्याचं औदार्य मी तुम्हाला दाखवलं, तर माझ्या जिवाची एका क्षणांत उलटी अंबारी होऊन माझ्या नाशाला मीच कारण

होईन. या सार्वभौम मानासिंगाशीं स्पर्धा करायची ताकद, आतां कुणाच्या अंगांत आहे ? आहे—अद्याप एक कृष्णसर्प मात्र, अर्धवट डोकं ठेचलं गेल्यामुळं, आपला रक्ताळलेला फणा मधून मधून वरती करीत असतो. ठीक आहे. दीपासिंगा तुझा आणि तुझ्या पोरीचा समाचार घ्यायला मी पूर्ण समर्थ आहे. बस्—रोहिणीसारखी लावण्याची खाण हस्तगत झालीच पाहिजे. भोळ्या, पण शूर जयसिंगाचीच या कामगिरीवर रवानगी केली, म्हणजे त्याच्या पश्चात् या पुढाऱ्यांच्या अर्जाची मला चांगलीच मुस्कटदाबी करतां येईल. आजचा हा पुढाऱ्यांचा अर्ज, जरा बेफामपणाचाच आहे. तो गोसावडाच याच्या मुळाशीं असला पाहिजे. छे: छे:; जयसिंगाला या टवाळ मंडळीच्या वावटळापासून दूर केलाच पाहिजे—कोण आहे रे पलीकडं ? ( सेवक येतो. ) जा, धाकट्या सरकारांना पाठवून दे. ( सेवक मुजरा करून जातो. ) हा गोसावडा साऱ्या पुढाऱ्यांच्या चेतना-शक्तीचं जीवन आहे, हें मी चांगलं ओळखून आहे. साऱ्यांच्या माना अशा मुरगळून— [ जयसिंग प्रवेश करतो. ]

**जयसिंग:**—कां हांक मारलीत ?

**मानसिंग:**—महत्वाच्या दोन गोष्टी बोलण्याकरितां मुद्दाम हांक मारली. जयसिंगा, हें मिळालेलं सार्वभौमत्व असंच जन्मभर कायम रहावं, असं तुला वाटतं ना ?

**जयसिंग:**—स्वपराक्रमाच्या बलावर वडिलांना मिळालेला सार्वभौमत्वाचा मान जन्मभर कायम रहाण्याची इच्छा, कोणता पुत्र करणार नाहीं ?

**पद—चाल—( बाल मुरे )**

**लाभ बलें, लाभे जगतीं ॥ मन बेबंद हो हें । बेबंद हो हें । आवरेना ॥ घ्रु० ॥ जगीं सदा सौर्य तव । जावो दश दिशा ॥ जन सकल हें;विस्मय पावे ॥ १ ॥**

**मानसिंग:**—शाबास ! आणि तेंच पवित्र कर्तव्य बजावण्याच्या पूर्व तयारीला, तुला आजपासून लागायचं आहे. जयसिंगा, सारे राजे मांडलिक

झाले, पण हा विलासपूरचा दीपसिंग मात्र हट्टीपणानं खंडणीच्या बाबतींत सारखी टोलवाटोलवी करतो आहे. तेव्हां त्याच्याकडं आत्तांच लक्ष दिलं, म्हणजे तो डोईजड होणार नाहीं.

**जयसिंग**:—पण त्याच्या जवळ शिल्लक तरी आतां काय आहे ? आपलं सार्वभौमत्व कबूल केलं, संपलं ! मेलेल्या सर्पावर घाव घालण्यांत काय अर्थ आहे ?

**मानसिंग**:—हेंच तें. तुला जें आतां शिकायचं आहे, आणि मला सुद्धां जें शिकवायचं आहे, तें हेंच. जयसिंगा, गारुडी सर्पाला जेव्हां पहिल्या प्रथम आपल्या चिमटयांत पकडतो, तेव्हां निरुपाय झालेला सर्प अगदीं मेल्यासारखा निचेष्ट पडतो. पण सर्पानं दाखविलेल्या या बाह्यांगी सोंगावर गारुडी मात्र कधींच फसत नसतो, हें लक्षांत ठेव. दीपसिंगाची बारीक हालचाल सुद्धां आपल्या नजरेंतून निसटतां कामा नये.

**जयसिंग**:—मग त्याच्यावर स्वारी करून त्याला इथं पकडून आणूं का ?

**मानसिंग**:—(स्वगत) त्याला इथं आणून काय करायचं आहे? रोहिणी इथं आली, तरच पाहिजे आहे ( उघड ) जयसिंगा, तो मगरूर इथं जन्म-भर सुद्धां कैदेंत राहील, पण तसं नाहीं, त्याच्या मनावर जबरदस्त परि-णाम होईल, अशीच गोष्ट अमलांत आणली पाहिजे.

**जयसिंग**:—अशी कोणती गोष्ट अमलांत आणली, म्हणजे योग्य तो परिणाम होईल ?

**मानसिंग**:—फक्त एकच गोष्ट. त्याला जाऊन असं कळव कीं, खंडणी वसूल होईपर्यंत, तुझी मुलगी रोहिणी तुला इथं ओलीस ठेवावी लागेल. ( जयसिंग दचकतो. ) कां ? असा दचकला कां बरं ? (स्वगत) हा त्या पोरीचं नांव घेतांक्षणींच असा दचकला कां बरं ? माझा हेतु तर ओळखला नसेल ? पण इतकी अक्कल याला खास नाहीं ?

**जयसिंगः**--पण मुलीला एकदम ओलीस मागणं, थोडं अविचारीपणाचं नाहीं का होणार ?

**मानसिंगः**--(हंसून) किती नाजुक हृदय आहे हें तुझें ! जयसिंगा, तुझ्या सारख्या नाजुक वृत्तीच्या जिवाला, हें माझं कृत्य एकादवेळीं अगदीं सैतानी सुद्धां वाटेल, पण राजकारणांतील हे नाजूक डाव तुला संवयीनं पुढं आपोआप कळायला लागतील. जा उशीर करूं नकोस. यावेळीं एक एक क्षण अगदीं लाखाचा आहे.

**जयसिंगः**-- (स्वगत) बोलणं अगदीं प्रेमळ दिसतं खरं; पण मधून मधून असा संशय कां बरं उपस्थित होतो आहे ? दिवाणजींचीं वाक्यं खरोखरच कां खरी होणार ? बाबांच्या या तत्वाच्या बुडाशीं खरोखरच का राजकारण आहे ? कां या राजकारणाला वैषयिक तत्वाचा मुलामा दिला आहे ? कांहींहि असलं, तरी मला गेलं हें पाहिजेच. ( उघड ) आपली आज्ञा मला शिरसावंद्य आहे; हा पहा मी निघालोंच. ( जातो. )

**मानसिंगः**--अस्सं—संशय पिशाच्चानं, एकंदरींत तुला घेरलेलं दिसतं आहे; जयसिंगा, तुझी झालेली ही साशंक वृत्ति, माझ्या करड्या नजरेंतून निसटणं शक्य नाहीं. जयसिंगा, माझ्या सुखांत व्यत्यय आणायाला जर कां तूं कारणीभूत झालास, तर पितापुत्राचं नातं एका बाजूस सारून हाडवैरी या नात्यानं साऱ्या जन्मभर स्वताची गर्दन गहाण ठेवावी लागेल हें पक्कं ध्यानांत ठेव. विरुद्ध जाणाऱ्या प्रत्येक व्यक्तीला या मानसिंगाच्या तडाख्याचा अनुभव एकदां तरी यायलाच पाहिजे. ( जातो. )—पडदा

---

## प्रवेश ४ था.

( **स्थळ**-- रस्ता—रत्नाकर प्रवेश करतो. )

**रत्नाकरः**—कमाल आहे दुर्गादासाच्या बायकोची ! गोरी आणि हजार गुण चोरी; असं म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं. इतकी छटेल बायको आपण कांहीं आपल्या आयुष्यांत आत्तांपर्यंत पाहिली नव्हती. कुठून झक

मारली, परवाची ती गोष्ट त्याला सांगितली. खरोखर नसतं सांगितलं तर त्या दिवशीं एवढी लठ्ठालठ्ठी मुळींच झाली नसती. पण एवढं सारं करून शेवटीं काय ? बायकोच दुर्गादासावर उलटली, आणि म्हणाली कीं, " माझ्या माहेरच्या ओळखीच्या माणसांवर हात टाकायला शरम कशी वाटत नाहीं म्हणून " ? आहे कीं नाहीं मजा ? आतां या शहरांत हिच्या माहेरच्या ओळखीचे मुसलमान लोक सुद्धां निघूं लागले हो. काय जहांबाज बायको आहे ? हिला ब्रह्मदेवानं इतकी फाजील घडविली तरी कशी ? कां, देवच त्या वेळीं इतका रंगेल बनला होता ? त्या बिचाऱ्या दुर्गादासाचे मात्र हिच्या पायीं आणखी काय काय हाल होतील कुणास ठाऊक ? दररोज मला या बाबतींत सल्ला विचारतो; पण या असल्या नटव्या आणि चढेल बायकोला, नीट सरळ-मार्गावर आणायला, दररोजच्या दररोज मी नवीन सल्ला देत तरी कुठवर बसूं ? छे: बुवा, या असल्या बनलेल्या बायकांबरोबर आयुष्य कंठायचं मोठं कठीण. ( पाहून ) पण हा पहा, दुर्गादास इकडंच येतो आहे; बिचाऱ्याच्या मुखचंद्राला कसं अगदीं खग्रास ग्रहण लागलेलं आहे; ( दुर्गादास प्रवेश करितो. ) वा: ! बरी रस्त्यावर गांठ पडली, आतां मी तुझ्या घरींच यायला निघालों होतों.

**दुर्गादास**:—माझ्या घरीं ? आणि आतां कशाला बाबा येतोस ! पुरा वीट आला आतां घरादाराचा.

**रत्नाकर**:—वेडा आहेस झालं; अरे, असा घरांदारांचा वीट येऊन का संसार होत असतो ? मर्दासारखा मर्द तूं, आणि इतक्यांतच असा हताश होतोस ! बरं, पण जाऊं दे; बायकोला आतां धाकांत ठेवायला सुरुवात केली आहेस ना ?

**दुर्गादास**—दररोज सुरुवात करतों, आणि दररोज समाप्ति होते.

**रत्नाकरः**—म्हणजे ? कांहीं परिणाम होत नाहीं ?

**दुर्गादासः**—अरे कसला घेऊन बसला आहेस परिणाम; उलट दुष्परिणाम मात्र होऊं लागले आहेत. चांगली फिटली हौस लग्नाची ! [ऐटींत पोषाख केलेला एक गृहस्थ, छडी फिरवीत समोरून निघून जातो.] हें बघ इथल्या इथं प्रत्यंतर. झकपक पोषाख केलेली ही स्वारी, आतां आमच्या घरांवरून अगदीं खाकरत, खाकरत जाणार, आणि आमची साळसूद गृहलक्ष्मी, जरी आतां अगदीं सैंपाक करीत असली तरी तश्शी खरखट्या हातानं उठून बाहेर येईल, आणि या स्वारीचें मुखमंडळ चोरून तरी पाहील. काय करूं रत्नाकरा, आजकाल ही असली भपकेबाज मंडळी, नेहमीं सकाळसंध्याकाळ, आमच्या घरांभोंवतीं, सारख्या अगदीं घिरट्या घालीत असतात. आतां सांग यांना आळा मी कसा घालायचा ? खोटं नाहीं रत्नाकरा, आजकाल आमचं हें घर म्हणजे नुसतं देवीचं देऊळ झालं आहे बरं. तें देऊळ तरी बरं; तिथं संध्याकाळीं तरी गर्दी होते; पण आमच्या घरांभोंवतीं तर सकाळचा सूर्य उगवल्यापासून, तो रात्रीचा चंद्र उगवेपर्यंत सारखी गर्दी. काय करूं रत्नाकरा, या मनोरमेच्या पायीं एकाद दिवशीं मला विष खाण्याची पाळी खात्रीनं येणार.

**रत्नाकरः**—हतभागी प्राण्या, तुझी ही केविलवाणी स्थिति पाहून या वेळीं मी इतका थिजलों आहे कीं कांहीं विचारूं नकोस. जाऊं दे. दरबारांत खर्डे घासायची वेळ झाली चल. [ जातात. ]—पडदा पडतो

---

## प्रवेश ५ वा.

[ **स्थळः**—अरण्य. राजा दीपसिंग व शिकारी वेषांत रोहिणी; आणि इतर कांहीं सरदार प्रवेश करतात. ]

**१ ला सरदारः**—थांबा, थांबा, महाराज असे एकदम पुढें जाऊं नका; त्या पलीकडच्या जाळींतच तो वाघ असण्याचा संभव आहे.

**दीपसिंगः**—कांहीं हरकत नाहीं. आज त्या वाघाचं शीर धडापासून वेगळं झालंच पाहिजे. खरोखर रोहिणी, अशा भलत्या वेळेला कशाला बरं इथं आलीस ? एकादवेळीं जनावर कसं उलटेल याचा कांहीं नेम आहे का ?

**रोहिणीः**—म्हणजे, आम्हांला नको वाटतं शिकार पहायला ? आणि मी म्हणजे जरी जनावर उलटलं, तरीपण जोंपर्यंत हा तिरकमटा माझ्या हातांत आहे, तोंपर्यंत असली छपन्न जनावरं मी एका घटकेंत लोळवीन.

**दीपसिंगः**—बाळे, आहेसच तशी तूं तिरंदाजींत हुषार. पण रोहिणी. आज ही शिकार मी एकट्यानंच करावी अशी माझी इच्छा आहे. त्या पलीकडल्या टेकडीवर तुला नेऊन बसवतों, आणि जर वेळ आलीच तर आहेसच तिथून तूं तीर सोडायला.

**रोहिणीः**—हो, हो, वेळ आली तर या रोहिणीचा तीर, त्या वाघाचं शीर ताबडतोब धडापासून वेगळं करील.

**दीपसिंगः**—शाबास ! बरं पण चल त्या टेकडीवर. ( सरदारांस ) इतक्यांतच वाघाला त्या जाळींतून हुसकाऊं नका, थांबा जरा मी आलोंच.

( रोहिणीला टेकडीवर नेऊन बसवतो. )

**२ रा सरदारः**—काय करतो आहे आज हा वाघ; कोण जाणें ? पण ते पहा आलेच महाराज; चला रे सावध व्हा. ( दीपसिंग प्रवेश करतो. )

**दीपसिंगः**—चला व्हा तयार; पिस्तुलांतील गोळी अगदीं तयार आहे. [ पिस्तुलाचा नेम धरतो; सरदार वाघाला आरडा ओरड करुन हुसकवतात; वाघ बाहेर येतो; दीपसिंगावर झडप घालतो; दीपसिंगाची गोळी चुकते;

रोहिणीचा तीर वाघाला लागतो, पण तो हात सोडीत नाहीं. इतक्यांत, जयसिंग दोन सरदारांसह प्रवेश करतो. ]

**सरदार**:—महाराज एकदम पुढं जाऊं नका, वाघ फारच चवताळलेला आहे; आपल्या हातांत बंदूक सुद्धां नाहीं.

**जयसिंग**--छे, छे, त्या गृहस्थाचा प्राण मला वाचवायलाच पाहिजे. ( वाघाचा जबडा दोन्ही हातांनीं फाडतो. )

**दीपसिंग**:—शाबास ! वारे वीर ! अहाहा ! धन्य आहे आपल्या शौर्याची.

**जयसिंग**:--थांबा, रक्तबंबाळ झालेला हा हात अगोदर नीट बांधून काढला पाहिजे. ( त्याच्या हाताला फेटा गुंडाळतो. )

**दीपसिंग**:—खरोखर आपले उपकार मी कधींहि विसरणं शक्य नाहीं. रोहिणी, रोहिणी, लौकर ये बाळे, या विजयी वीराचं अभिनंदन करायला लौकर ये. ( रोहिणी येते. )

**रोहिणी**:—वाघ मेला काहो बाबा ? ( स्वगत ) अगबाई, पण माझ्या बाबांना पुनर्जन्म देणारा, हा कोण बरं वीरपुरुष असावा ? कोण बरं पण हे ? यांच्याकडं सारखं कां बरं बघवत नाहीं ?

**दीपसिंग**:—तो बघ रोहिणी, वाघ अगदीं ठार झालेला आहे. पण हो, ज्या एवढ्या मोठ्या पराक्रमी वीरानं माझे आज प्राण वांचविले, त्याचं नांव विचारायचं तसंच राहिलं. काय बरं आपलं नांव ?

**जयसिंग**:—विजयनगरच्या महाराजांचा मुलगा मी जयसिंग.

**दीपसिंग**:—( आश्चर्यानें ) काय म्हणतां ? आणि आपण इकडं कुणीकडं ?

**रोहिणी**:—( स्वगत ) अस्सं काय ! आजपर्यंत कानानं नांवलौकिक ऐकला, पण देवानं आज प्रत्यक्षच दाखविला.

**जयसिंग**:--आपलंसुद्धां नांव मला कळवाल तर—

**दीपसिंग**:—माझं नांव दीपसिंग.

**जयसिंग**:—अरे, वाः ! अगदींच विलक्षण योगायोग म्हणायचा ! आपल्याकडंच कांहीं कामाकरितां मी यायला निघालों होतों.

**दीपसिंग**:—फारच उत्तम. अगदीं आनंदानं आतां शहरांत जाऊं–या. केवढा जबरदस्त वाघ–होता हा. (दोघेही वाघ बघायला बाजूला होतात.)

**रोहिणी**:–( स्वगत ) आमच्याच इथं येणार; हें ऐकून मनाला किती, किती समाधान वाटतंय पण ! आजपर्यंत कधीं सुद्धां चंचल न होणारं माझं मन आज—

**पद--( चालः—'हा धनमद युत' )**

**हे ललित नयन अति क्षणांत, भान भुलवि अबला ॥**
**॥ धृ० ॥ वीर विजयी देखिला । स्वाभिमान लोपला ॥**
**ओढ घेइ मम मन हें, पंचबाण गमला ॥ १ ॥**

**दीपसिंग**:--खरोखर जयसिंगजी—

**पद—( चालः--बिरजमें धूम मचाई )**

**मृत जिवां देई जन्म हा आज ॥ धृ० ॥ जीव जगवि-**
**ण्याला कृपा काज ॥ अर्पिल बाला । आदरि माला ।**
**किंचित ना धरि लाज ॥ १ ॥**

**जयसिंगः**--पण तो विचार आज कशाला हवा आहे ! आलेल्या संकटांतून पार पडल्याबद्दल त्या जगदीश्वराचे अगोदर आभार मानले पाहिजेत.

**पद--( चालः—'देवता कां मुकता' )**

**भाउका भाविकता हृदयां ॥ राहे नित्य जागृत जरि**
**॥ धृ० ॥ देव तयां प्रेममया । नाश काल ना तयां ।**
**ईश कृपें । दीन तरे । वानुं तव किती, गुण हरी ।**
**कृपा करा, प्रभो सतत ॥ १ ॥**

( रोहिणी खेरीज सर्व जातात. )

**रोहिणीः**—( स्व. ) मला इतकी वेडी बनवायला, आजपर्यंत एक सुद्धां पुरुष विजयी झाला नव्हता, पण आज मात्र या जादूगारानं अगदीं चांगलीच जादू केली म्हणावयाची ! अगबाई ! सारी मंडळी पुढं निघाली तरी मी माझ्या सुखमय विचारांतच दंग ! वेडे रोहिणी, आज मात्र तुला चांगलंच वेड लागलं आहे. विजयी वीराचा मघाचा पराक्रम डोळ्यापुढं उभा राहिला, म्हणजे मन कसं गुंगून जातं. परमेश्वरा; या भांबावून गेलेल्या वेड्या बालिकेचं प्रेमस्थान अगदीं अढळ ठेवशील ना ?

पद—(चालः—'पांडवा सम्राट् पदाला')

**माधवा ही एक सदया, ऐक विनती प्रेमला ॥ धृ० ॥**
**त्वत्–कृपेचा आजवरि तूं, मेघ जैसा सिंचिला ।**
**बालिकेची दयित मूर्ति, अढळ ठेवि हृदयीं या । भाव**
**मनिचा जाणि ईशा; तूंचि त्राता समर्थी या ॥ १ ॥**

अंक १ ला समाप्त.

# अंक २ रा.

## प्रवेश १ ला.

[ **स्थळः**--विलासपूर. राजा दीपसिंगाचा महाल. दीपसिंग आजारी आहे, व पलंगावर पडलेला आहे. ]

**दीपसिंगः**—( खिन्न स्वरानें ) जयसिंगजी, जयसिंगजी, तुम्हीं माझ्या हृदयाला केवढी जबरदस्त जखम केलीत हो ! अरेरे ! मानसिंगानं माझी मुलगी ओलीस मागितली ! आणि हा अविचारीपणानं घाडलेला निरोप, जयसिंगजी, तुमच्या सारख्या शहाण्या माणसानं मला कळवावा अं ! जयसिंगजी, माझे प्राण वांचविणारा आपला तो प्रेमळ हात, माझ्या लाडक्या रोहिणीच्या हातांत देऊन, एकदां कायमचा काळजींतून सुटेन, या आशेवर मी भावी सुखमय प्रदेशांत, एकाद्या बागडणाऱ्या स्वैर पक्ष्याप्रमाणं, अगदीं उंच उंच भराऱ्या मारीत होतों; पण—जयसिंगजी, तुमच्या त्या निष्ठूर उत्तरानं, माझ्या लाडक्या रोहिणीचे सारे आशांकूर, जळून **अगदीं** खाक झाले. नीच मानसिंगा, मी मरेपर्यंत हरामखोरा, तुझ्याशीं भांडेन, पण तुझ्या पापी दृष्टीला रोहिणीचं नख सुद्धां दिसूं देणार नाहीं. मी मेल्यावर जर रोहिणीचे कांहीं हाल झाले, तर परमेश्वरा, तूंच त्याबद्दल जबाबदार आहेस. अरेरे ! निराशा ! अगदीं निराशा ! ( स्वस्थ पडतो. )

( रोहिणी प्रवेश करते. )

पद—( चालः—" सुखाचा शोध " )

**साहिना सौख्य अबलेचें; विधीनें डाव जिंकियला ॥ धृ० ॥ सहज ही झाली तव लीला; आशेचा सूर्य मावळला । जनक तो दुखाविला गेला; सुता ये व्यर्थ जन्माला ॥ १ ॥**

ज्या गोष्टीची कधीं माझ्या स्वप्नांत सुद्धां कल्पना येणं शक्य नव्हती, तीच गोष्ट, दैवा, आज तूं दृश्यस्वरूपांत दाखवूं पहात आहेस ! आजपर्यंतचं माझं सुखमय आयुष्य, कष्टमय करून, तूं कोणतं स्वर्गीय सुख अनुभवणार आहेस रे ! बाबा, आजपर्यंत तुम्हीं आपल्या स्वतःच्या प्राणापलीकडं, ज्या या तुमच्या आवडत्या रोहिणीला जपलीत, तीच बाबा, तीच रोहिणी,आज तुमचे प्राण धोक्यांत घालायला कारणीभूत होत आहे ! मानसिंगा, सरळ हृदयाच्या जयसिंगजींना, जरी तुझा कावा समजला नसला, तरी पण नराधमा, ही रोहिणी, तुझं पुढलं सारं कारस्थान अगदीं नीट ओळखून आहे. उज्वल कुमारिकेचं कौमार्य भ्रष्ट करूं पाहणाऱ्या सैताना, ही रोहिणी कच्च्या दिलाची नाहीं, याचा अनुभव तुला आल्यावांचून राहणार नाहीं. ( दीपसिंग जरा हालतो ) अगबाई, पण बाबा जागे झाले वाटतं ? (जवळ जाऊन पाय चेपूं लागते. )

**दीपसिंगः**–( खिन्नस्वरांत ) को–ण–? कुठं आहे मा–झी रोहिणी–

**रोहिणीः**–आपल्या अगदीं जवळ आहे हो, बाबा. आतां कसं वाटतंय मघांपेक्षां ?

**दीपसिंगः**–बरं–वा–टतं–ग–पण–

**रोहिणीः**–जरा आपलं मन शांत ठेवा पाहूं. बाबा, अशानं दुखणं जास्त नाहीं कां बरं वाढायचं ? तुम्हीं बरे झालांत, म्हणजे आलेल्या प्रसंगाला आपण अगदीं खात्रीनं तोड काढूं. पण गप्प–निजा बरं अगोदर.

**दीपसिंगः**––बाळे, गप्प काय निजा ! ही भयंकर स्थिति मला गप्प कशी पडूं देईल ? तुझं आणि जयसिंगजींचं गोड झालेलं डोळ्यानं पहावं, म्हणून त्यांना किती तरी मीं परोपरीनं विनविलं ग; " पण बापाच्या परवानगीवांचून मी कांहीं एक करणार नाहीं, " असाच हट्ट ते घेऊन बसले आहेत. बापाचं उलटं काळीज त्यांच्या अद्याप ध्यानांत तरी कसं येत नाहीं ? येथून हट्टानं त्यांनीं तुला जर नेली तर––तर काय ? रोहिणी

बाळे, तो नीच—शिव ! शिव ! पुढले शब्द माझ्याच्यानं नाहीं ग उच्चारवत. शेवटीं निराशा ! जिकडं तिकडं निराशा ! !

**रोहिणीः**–( स्वगत ) यावेळीं बाबांना जर मी धीर दिला नाहीं, तर भलताच प्रसंग ओढवावयाचा. (उघड) पण बाबा, किती पण छान युक्ति मला आतां आठवली. बाबा, त्या युक्तीनं आपण आलेल्या संकटांतून अगदीं खात्रीनं पार पडूं.

**दीपसिंगः**—( एकदम उठून बसतो. ) सांग बाळे, कोणती युक्ति ती ?

**रोहिणीः**—छे; छे; या–वेळीं मी कांहींसुद्धां सांगायची नाहीं बाबा, अगोदर नीट स्वस्थ पडा बरं. ( त्याला नीट निजवते. ) हं; पडा अगदीं स्वस्थ; अगदीं सुद्धां आतां काळजी करायची नाहीं हं; बरं वाटलं, कीं मग सारं सांगेन.

**दीपसिंगः**—ईश्वर तुझ्या युक्तीला यश देवो. ( स्वस्थ पडतो. )

**रोहिणीः**—( उठून ) ( स्वगत ) काय ही स्थिति ! जयसिंगजी, असा कसा हो आपल्या सैतानी बापावर विश्वास ठेवतां ? आपल्या डोळ्यांच्या जादूनं वेडी झालेली ही रोहिणी, आज दोन दिवस आपल्या शुद्ध प्रेमरसाचे घुटके अगदीं मनुमुराद घेत होती; पण त्या प्रेमरसांत मागाहून असा विषाचा थेंब टाकून, माझं सारं जीवित कसं हो अगदीं कवडीमोल केलंत? आपली तेजस्वी आणि रम्य मूर्ति सतत डोळ्यांसमोर रहावी, म्हणून मोठ्या आशेनें चित्रकारांकडून ही तसबीर काढविली; पण साऱ्याच आशेची शेवटीं राखरांगोळी झाली. ( बापाकडे पाहून ) माझ्या गोड आश्वासनानं बाबांना अगदीं गाढ झोंप लागली. आतां जयसिंगजींना स्वतःच जाऊन शेवटचं विचारते, आणि आयुष्याचा निकाल लावून घेते. या चित्राकडं परत परत पण पहावंसं वाटतं—लबाडा—

**पद—(चालः—' बाली उमर ')**

**टाकिसि जरि मधु मोहा ॥ राजिवा ॥ धृ० ॥ फसवि न मज मी । भोळी अबला ॥ रत होई जिव वेडा ॥ राजिवा ॥ १ ॥**

**प्रणय–चटक ही । भुलवि भाना । बावरि करि ललनांना ॥ राजिवा ॥ २ ॥** [ जाते ] पडदा पडतो.

## प्रवेश २ रा.

[**स्थळ**–तुळशीबाग. एका बाजूला एक महादेवाचें देवालय.]

**खांसाहेबः**—( प्रवेश करून ) पता चला के चाहि है वैसे चीजें इन मंदिरोंमें मिलसक्ती हैं. वाहवा रे मानासिंग महाराजका कारोबार ! अं–इमे और बातोंसे क्या मतलब ? काम बननेसे काम ! राजाजीको चंद्रकलाका बहोत प्यार था; लेकीन वह तो इतनी हराम बनगई, कीं प्यार, मोहब्बत, इष्क के बोल बोलने लगगई, और नालायक सरीकी, वह प्यारेलालको प्यारा मानकर, उस्के प्यारो पंजोसे दबगई. मेरी तो क्या चलाई ! मगर उसने राजाजीकी भी कद्र न की. खैर ! हुवा सो हुवा ! चंद्रकला नहिं तो और कोई बला सही. आपनेको क्या ? कोई भी खुपसुरत देखना और महाराजको दे देना. ( पाहून ) अरे, यह कौन आ रहा है ? छुपकर देखना चाहि है. ( एका झाडाआड, लपून उभा राहतो. शंकरराव प्रवेश करतो. )

**शंकररावः**–बस्, बस्; अगदीं वेळेवर आलों. या मनोरमेच्या प्राप्तीकरितां, आज इतके दिवस सारखा प्रयत्न करतों आहें, तेव्हां कुठं आज थोडं यश मिळालं. इतके दिवस दुर्गादासाच्या घरांतच शिरकाव होईना; पण महाराजांचा कांहीं तरी निरोप काढून एकदांचा शिरकाव केला. या चवचाल चांदणीला महाराजांच्या नजरेला एकदां केव्हां तरी घालायची, पण ती हातांत एकदां पुरतेपणीं सांपडली पाहिजे; मग ऐसा उडवतो बार, कीं यंव; आज सकाळीं घाईघाईत; मनोरमेनं तितक्यांतच हातचलाखी करून ही चिठ्ठी मला दिली. ( चिठ्ठी बाहेर काढून ) अहाहा ! या चिठ्ठींतला एक एक शब्द वाचला, म्हणजे असं कससंच होतं कीं; पण छेः—

तें नुसतं बोलून दाखवून, नाहीं हो मनाचं समाधान होत. हा दुर्गादास अगदीं बावळट आहे, हें एक ठीक आहे; हो; नाहीं तर या चटकचांदणी-करतां एकादेवेळीं जोडाजोडी सुद्धां व्हायची. ( पाहून ) पण अजून कशी येत नाहीं ? संध्याकाळ तर खूप झाली, आणि हिचा पत्ता अजून कसा नाहीं ? छेः बुवा, हा विरह कांहीं सहन करवत नाहीं. तो गोड मुख-चंद्रमा एकदां केव्हां दिसेल असं झालं आहे हो मला. मनोरमा—मनोरमा-( इकडं तिकडं येरझारा घालतो )

**खांसाहेबः**-( स्वगत. ) दुर्गादासकी घरकी तारीफ मैं भी सुनरहाथा; और आज तो आंखोंसे देखनेको मिलेगा. जाके इसीकोहि अभी पुछता हूं, के क्या मामला है. ( पावलं वाजवितो. )

**शंकररावः**-अरे, पावलांचा आवाज झाला आत्तां. आली वाटतं. पण मनोरमाच का येते आहे; का दुसरं कोणी येत आहे ? या काळोखांत बरोबर दिसत सुद्धां नाहीं हो. ( नीट निरखून पाहून ) अरेरे—पुरा घात झाला, सारा कसा अगदीं विरस झाला; हा बोकड यावेळीं इथं येऊन कशाला तडफडला ? काय साडेसाती आहे पहा. सुंदर सकेश रमणी डोळ्यापुढं येण्याची वाट पहात बसावं, आणि शेवटीं विद्रूप विठ्ठलसवा-ष्णीनं यावं, त्यांतलाच हा प्रकार झाला आहे म्हणायचा. मनोरमेच्या गोड आलिंगनाला हपापलेलं हें शरीर, या काटेरी कुंपणांत अडकून शेवटीं रक्तबंबाळ होण्याचा योग मात्र आला आहे. पण हा लेकाचा खांसाहेब गवई इथं अचूक यावेळीं कसा आला ? कां याहि स्वारीला इथं कांहीं लम्यांश आहे ? ये म्हणावं तूं, कसा ना कसा तरी घालतोच खड्डयांत तर नांवाचा शंकरराव. ( खांसाहेब जवळ येतो. ) सलाम, खांसाहेब सलाम.

**खांसाहेबः**—ओ, हो, हो; सलाम जी सलाम. कौन शंकरराव; आप है; ( हंसतो. ) मेरे समझ में आया, के कोई और होगा. क्यौं दोस्त, इसवक्त ? ( नाकपुडीवर खुण करतो. )

**शंकरराव**:—बस्, बस्, खांसाहेब, इसवक्त तो उसने आनाहि चाहि है. (स्वगत.) मला वाटलंच कीं खांसाहेब नाकपुडीवर खुण करणार म्हणून. हं ! एकंदरींत आमचं नशीब चांगलंच कोलांट्या उड्या मारतं आहे म्हणायचं. कांहीं हरकत नाहीं.

**खांसाहेब**:—क्योंजी ? कब आयेगी वह परी ? तुम्हारी उसकी अच्छी तऱ्हेसे पहछान—

**शंकरराव**:—बस्, बस्, सब है. तुम अब मत फिकीर करो. मैं अब सब मामला ठीक कर देतां हूं. लेकीन पहिले ऐसा करो, तुम ह्यांसे वहां दूर जाकर बैठो; और वह जब आयेगी, तो तुम्हारे वहां उसको जलदी भेजताहूं.

**खांसाहेब**:—बहोत अच्छा. उदर जाके बैठता हूं. (जाऊं लागतो.)

**शंकरराव**:—(स्वगत) या गाढवाला पुरताच कोकलत ठेवला पाहिजे. (उघड) खांसाहेब, खांसाहेब, जरा सबूर करो. ये देखो, वह जब ह्यां आयेगी, तो तुमारे नाम का उसको कुछ पहिले नजराणा देने को होना यार.

**खांसाहेब**:—(अंगठी काढून देतो.) अरे यार उस परीके लिये तो मैं मेरी जान भी कुरबान करनेको तय्यार हूं. अच्छा, उसको आते वक्त जलदी भेजदेना. ( जातो. )

**शंकरराव**:—( मोठ्यानं हंसून ) आते वक्त भेजदेना; जैसा इसके बापकाहि मैं गुलाम हूं. काय बेअकली बोकड आहे पहा; वेड्यानं ही अंगठी आपल्या नांवानं द्यायला माझ्याजवळ दिली. पण या मूर्खाला हें माहीत नाहीं, कीं ही अंगठी शंकरराव स्वतः आपल्या नांवानं ती मनोरमेच्या नाजुक करंगळींत घालणार आहे. पण ही पहा, आलीच ती चटक चांदणी. जरा आड व्हावं. ( झाडाआड उभा राहतो, पूजापात्र हातांत घेऊन मनोरमा प्रवेश करते. )

**मनोरमाः**–( इकडं, तिकडं पाहून ) अगबाई, शंकरराव नाहींच का आले शेवटीं ? मी एवढ्या हजार सबबी सांगून घरांतून बाहेर पडलें, आणि अगदीं धापा टाकीत ज्यांच्याकरितां आलें, त्यांनीं शेवटीं असं फसविलं काय ? काय मेली पुरुषांची जात निष्ठुर आहे पहा ! आम्हीं मात्र आमच्या अगदीं शब्दाला जागून, यांच्यासाठीं जिवाचं रान करावं, आणि यांना नुसते इथपर्यंत येण्याचे सुद्धां कष्ट पडूं लागले अं ? मेली थोडी तरी दया माया—

**शंकररावः**–( एकदम पुढं येऊन ) नाहीं, अशी का लाडके तुझी कल्पना आहे ?

**मनोरमाः**–बाई, बाई, बाई ! आतां मात्र अगदीं शर्थ झाली हं. असा अगदीं इतका का आमचा अंत पहायचा ?

**शंकररावः**–(स्वगत.) ठार मेलों हिच्या या गोड शब्दांनीं. काय जादु भरली आहे या चटकचांदणींत. ( उघड ) मनोरमे, तुला आज अगदीं खूप त्रास पडला नाहीं ?

**मनोरमाः**–हो, बरं पडला त्रास ? मग—

**शंकररावः**–त्याची क्षमा—

**मनोरमाः**–क्षमा होय ? फक्त एकाच अटीवर हं—

**शंकररावः**–सांग, सांग लावण्यलतिके, कोण ती तुझी अट ?

**मनोरमाः**—पहा हो—

**शंकरराव**–पाहिलं, पाहिलं सारं पाहिलं.

**मनोरमाः**—

पद. (चालः—'गुलाम बादशहे')

**सौख्य सागरीं हो, पोहुं चला नाथा आतां ॥ धृ. ॥**
**मृदुल जीव हा, शिणला । बाई जाच सोसेना हा ॥१॥**
**ठेव जीवाची, ठेविं हृदयीं नाथा आतां ॥ जीव बाई**
**हा हळवा । न्या हो प्रणय गावां आतां ॥ २ ॥**

**शंकरराव**:–अहाहा ! माझ्या प्राणा, खुशाल विमल प्रणयाचा गोड आस्वाद घे, आणि याहि जिवाला समाधानाचं सुख दे. ( स्वगत. ) या पांखराला महाराजांच्या फत्तेगडांवर दाखल केलंच पाहिजे. महाराज हिच्या मोहपाशांत एकदां अडकले, कीं माझा पुढला डाव फत्ते झालाच पाहिजे. ( उघड ) मनोरमे, तुला आपल्या महाराजांचं दर्शन घेण्याची कधीं सुद्धां इच्छा होत नाहीं ?

**मनोरमा**:–शंकरराव, महाराजांचं दर्शन घेण्याची इच्छा प्रत्येकाला झालीच पाहिजे. पण बाई करायचं काय ? घरच्या आगवेताळ स्वभावामुळं इकडचं इकडं सुद्धां मेलं जातां येत नाहीं.

**शंकरराव**:–मनोरमे, तूं आतां माझ्या म्हणण्याप्रमाणं वागत चल. आत्तां आणतों घरचा वेताळ ताळ्यावर. उद्यां संध्याकाळीं महाराजांचा फत्तेगड दाखवायला तुला घेऊन जाईन; येशील ना ?

**मनोरमा**:–हो; पण घरचा बंदोबस्त—

**शंकरराव**:–ती सारी व्यवस्था मी नीट करतों. दुर्गादासाचा आतां नीटच बंदोबस्त करतों. बरं पण आतां इथंच असं उभं तरी किती वेळ रहायचं ? त्या कारंजावर जाऊन बसूं. चल.

[ दोघे जातात. दुर्गादास प्रवेश करितो. ]

**दुर्गादास**:––थकलों बुवा हिला धुंडाळतां धुंडाळतां. काय जहांबाज अवदसा आहे ! थापा मारण्यांत तर आतां इतकी तरबेज झाली आहे, कीं भर दिवसाढवळ्या धूळ फेकते हो माझ्या डोळ्यांत. मला म्हणाली कीं आज सोमवार आहे, आज तरी शंकराच्या देवळांत दर्शनाला जाऊं द्या; म्हटलं जाऊं द्या. पण हालचालीवर तरी लांबून डोळा असावा; म्हणून धापा टाकीत हळूंच इथं या देवळांत पहायला आलों. तों काय ? या देवळांत तर शंकर आपला एकटाच दिसतो आहे. आतां या अवदसेचा दुसरा कोणी शंकर निघाला कीं काय? काय करूं ? ही एकदां अपराधासकट पुर-त्तेपणीं नाहीं हो माझ्या ताब्यांत सांपडत! प्रत्येकवेळीं अवदसा अशी कांहीं कारणं

टाळक्यांतून शोधून काढते, कीं माझ्या तोंडाला अगदीं सपशेल कुलुप बसतं. जो हिला भेटतो, तो हिच्या माहेरच्याच ओळखीचा निघतो. अरे, आहेत तरी किती या शहरांत हिच्या माहेरच्या ओळखीचे ? मला आतां हिच्या बापाला एक पत्र खरडून विचारलं पाहिजे, कीं आपल्या मुलीच्या ओळखीच्या साऱ्या गृहस्थांची एक याद तरी तयार करून माझ्याकडं पाठवून द्या. ( एका बाजूनें शंकरराव झपाट्यानं जाऊं लागतो. ) अं ? हे कोण ? शंकररावच दिसत आहेत ? शंकरराव, अहो शंकरराव–अहो जरा इकडं तर या.

**शंकरराव**:–छेः, छेः, फारच उशीर झाला आहे दुर्गादासराव. उद्यां जरूर येईन घरीं, पाहिजे तर भेटायला. ( जातो. )

**दुर्गादास**:–कशाला, कशाला तसदी घेतां एवढी ? आहे कीं नाहीं मजा ? मी घरीं न बोलावतां, आपणच लेकाचा म्हणतो आहे कीं मी येईन म्हणून. असले चोर आमच्याकडं अगदीं जरुर यायचे; नुसतं नांवाला म्हणायचं कीं तुमच्या भेटीला आलों म्हणून. पण घरांत आल्याबरोबर थेट चुलीपाशीं अगदीं पाण्याचा तांब्या मागायला जायचे ! हरामखोरांना एवढी अगदीं घरांत येतां क्षणींच कशी तहान लागते ? बरं लागली तहान, तर आमच्या जवळ बाहेर मागायचं पाणी, कां अगदीं थेट वहिनी वहिनी हांक मारीत अगदीं चुलीपाशीं जायचं ? मजा आहे एक एक दुनियेंत झालं. ( मनोरमा देवळामागून हळूच जाऊं लागते. ) अं ? या कोण हळूंच तिकडून चालल्या ? काळोखांत तोंडसुद्धां बरोबर दिसत नाहीं हो. कोण बरं पण ही ? अगदीं मनोरमेसारखी दिसते आहे–हो–खास मनोरमाच. ( जवळ जाऊन तिला ओढीत पुढं आणतो. ) हं; कां ? सापडल्यांत कां आतां ? कुठं गेली होतीस बोल.

**मनोरमा**:–( स्वगत ) आतां जरा धिटाईनंच वागलं पाहिजे. (उघड) कुठं गेले होतें म्हणजे ? इकडंच देवाला आलें होतें.

**दुर्गादास**:–देवाला आलीस काय ? अग अवदसे—

**मनोरमा**:–हं, खबरदार; वाटेल तसल्या नांवानं हांक माराल तर ? लाज नाहीं वाटत घरच्या बायकोला अवदसा म्हणायला ?

**दुर्गादास**:–तोंड मीट अगोदर. कुणासमोर बोलते आहेस ?

**मनोरमा**:--मग, उगीच एकाद्यावर तोंड सोडायचं म्हणजे काय ? मनुष्यानं चूक पदरांत घालावी आणि मग बोलावं.

**दुर्गादास**:--अस्सं काय ? अशी इकडून कुणीकडून आलीस ग ? देव त्या बाजूला आहे वाटतं ?

**मनोरमा**:—देव त्या बाजूला जरी नसला तरी फुलं त्या बाजूला आहेत ना ? फुलं तोडायला तिकडं मी गेलें होतें समजलांत का ?

**दुर्गादास**:—अस्सं ! चल दाखव फुलं तोडलींस तीं ?

**मनोरमा**:--हीं पहा नीट डोळे उघडून ( फुलं दाखवते. ) पाहिलींत का ? फिटला कां आतां संशय ?

**दुर्गादास**:—मनोरमे, इमानानं सांग, कीं फुलं तोडायलाच तूं तिकडं गेली होतीस !

**मनोरमा**:--त्यांत कसलं मेलं बोलायचं इमानानं ? असल्या संशयी माणसापुढं प्रसंगीं जरी मान कापून ठेवली तरी सुद्धां खरं वाटायचं नाहीं. हें काय मेलं एकसारखं दररोज छळणं ? फार त्रास द्यायला लागलांत तर खुशाल माहेरीं जाऊन बसेन.

**दुर्गादास**:--अगदीं या क्षणाला चालती हो माझ्या घरांतून. तुझ्या मागं दोन दिवस सुखानं तरी राहीन.

**मनोरमा**:--तर, तर, न सुखानं रहायला काय झालं ? माझा कांटा एकदां उपटून टाकलांत, कीं मग आहेतच चारी दिशा मोकळ्या; अगदीं दिवसाढवळ्या चार घरांत आणवून नाचवाल. म्हणे घरांतून चालती हो– अशा धमकावण्यांना भिणारी ही बायको नाहीं समजलांत ? माझ्या बापानं आपल्या घरांत भरलेला पैसा अगोदर सव्याज भरून घेईन, आणि मग पुढं पाऊल टाकीन समजलांत ?

**दुर्गादासः**—( स्वगत ) अरेरे ! काय करूं ?

**मनोरमाः**—( स्वगत ) आतां लवकर निसटलं पाहिजे येथून. आगींत तूप ओतून आग तर चांगलीच भडकावली आहे. ( उघड ) मला छळतां काय ? थांबा, एकेका शब्दांवर तुम्हाला नाचवीन म्हणावं ( जाते. )

**दुर्गादासः**—( देवळाच्या पायरीवर जाऊन बसतो. ) परमेश्वरा, कां विनाकारण माझा अंत पहातो आहेस ? ( खांसाहेब प्रवेश करतो. )

**खांसाहेबः**—अरे, ये शंकरराव कहां गया ? मैं तो कबसे वहां बैठा हूं ? लेकीन् शंकररावभी आयानहिं, और वह खुपसुरत औरतभी आयी नहिं. ये कौन बैठा है इदर ? क्या शंकररावहि है ? ये अंधेरामें उसका मूंभी बराबर दिखता नहि ? कौन शंकरराव ?

**दुर्गादासः**-( स्वगत ) ही कोण स्वारी आली इकडं ? हा तर खांसाहेब गवई; आणि मलाच शंकरराव समजून हांक मारतो आहे. ठीक आहे. याला उत्तराला उत्तर देऊन काय कारस्थान आहे तें समजून घेतलं पाहिजे. ( उघड ) कोण खांसाहेब ? हो मी आहें तो शंकरराव.

**खांसाहेबः**-अरे, वारे यार; खूप ठकाया मेरेको. क्यौंजी, खूपसुरत कहां है ?

**दुर्गादासः**-( स्वगत ) अरेच्चा ! हें काय गौडबंगाल आहे ? हा कोण आली नाहीं म्हणतो ? छेः छेः, चांगलं नीट समजून घेतलं पाहिजे. ( उघड ) खांसाहेब, अभीतक नहि आयी वह.

**खांसाहेबः**-क्या नहि आयी ? फिर देव मेरी अंगुठी. अब क्या जरुरत है उसकी ?

**दुर्गादासः**-रहिनादेवजी मेरेपास; मैं देऊंगा उसको.

**खांसाहेबः**-फिर तुम क्या वह दुर्गादासके घरकूं जावगे. ?

**दुर्गादासः**-( स्वगत ) अरे, बाप रे ! अरेरे ! या सटवीचंच हें सारं कारस्थान हो. अवदसे—पुरी काळोखी फासलीस आतां—( उघड ) खांसाहेब, तुम जाव अब, मैं देऊंगा उसको.

**खांसाहेबः**—अच्छा जाता हूं मैं. दुर्गादासके औरतको सब मेरी हाल हवाल कह देना. अच्छा जाता हूं. ( जातो. )

**दुर्गादासः**—काय करूं आतां या अवदसेचं ? करूं का खून आत्तांच्या आत्तां घरीं जाऊन ? मनोरमे, मनोरमे, अग तूं ब्राह्मणाची बायको, आणि हा मुसल—अरेरे–या वेळीं टाळक्यावर वीज पडून मी मेलों असतों तर किती तरी बरं झालं असतं–देवा–देवा–काय करूं रे–( हात पाय आपटीत निघून जातो. ) —पडदा पडतो.

---

## प्रवेश ३ रा.

[ **स्थळः**—विलासपुरांतील एक रस्ता. स्वामी प्रवेश करतो. ]

**स्वामीः**—( स्वगत. ) मानसिंगाच्या कावेबाजपणाची एक एक कृति अगदीं आश्चर्यचकीत करते. पुढाऱ्यांच्या अर्जाच्या प्रकरणाची चळवळ जयसिंगाला कळूं नये, म्हणून कांहीं तरी कारण काढून हरामखोरानं जयसिंगाला या इथं विलासपूरला पाठवला. धूर्त मानासिंगा, राजकारणांतला हा डाव तूं सफाईनं खेळलास खरा, पण तो माझ्या मात्र चांगलाच पथ्यावर पडला. आजपर्यंत जयसिंगाची व माझी एकांतांत गांठ पडूं नये, म्हणून अगदीं सारखा जपत आलास, पण परमेश्वरी इच्छा निराळी होती, म्हणूनच मला इथं येण्याची बुद्धि होऊन, आतां मनमोकळेपणानं गांठ घेण्यास अवसर मिळाला. या विलासपूरचा राजा दीपसिंग, खरोखरच या विलास• पूरचा तेजस्वी दीप आहे. सैन्यबलाच्या आणि आर्थिकबलाच्या अभावानं, जर दीपसिंग कमकुवत बनला नसता, तर आज एका क्षणांत हा मानासिंगाचा सैतानी धुडकूस त्यानं बंद केला असता. असता आणि नसता ! जोंपर्यंत न्यायदेवतेच्या सौभाग्यसूर्याला ग्रासून टाकणारा दैत्य अद्याप बलवत्तर आहे, तोंपर्यंत व्यवहारी जीवांनीं, आशेच्या किरणांची अपेक्षा करणं केव्हांहि मूर्खपणाचंच ठरेल. ( पाहून ) अरे, पण ही कोण इकडं येते

आहे ? ही तर दीपासिंगाची मुलगी रोहिणी; आणि चेहऱ्यावर हिच्या एवढी उदासीनता कां ? अरे, पण हें काय मी पहातों आहें ? हातांतल्या खंजीराकडं ती अगदीं सारखी पहाते आहे. परमेश्वरा, काय समजूं मी याचा अर्थ ? स्वतःच्या जिवाचं ही कांहीं वेडंवाकडं तर करून घेत नसेल ना ? या पलीकडल्या राजबागेंत तर जात नसेल ? कारण जयसिंग तिथंच उतरलेला आहे. पण छेः; प्रत्यक्ष नीट पाहिल्यावांचून कांहीं समजायचं नाहीं. या पलीकडल्या राजबागेच्या आसपासच मला टेहळणी करीत राहिलं पाहिजे. ( जातो. रोहिणी खंजीर घेऊन प्रवेश करते. )

**रोहिणीः**—बा खंजीरा, जरा थांब. ही रोहिणी आपल्या काळजाचं रक्त तुला लौकरच प्यायला देऊन, तुझी तृषा खात्रीनं शमवील. पण एक घटका थांब. जगाचा शेवटचा निरोप घ्यायच्या अगोदर माझ्या हृदयांत सांठवून ठेवलेल्या प्रणयचंद्राचं मला शेवटचं दर्शन घेऊं दे. जयसिंगजी, अभागिनीला भिक्षा घालतां का ?

पद—( चाल—' सोनेका ये समय है. ' )

**दारासि ये भिकारी ॥ नाथा न त्यां हो मारीं ॥ धृ० ॥**
**भिक्षाहि नाहीं भारी । जीवां न या हो मारीं ॥ १ ॥**
**मासा सुखी जलानीं ॥ द्या तैसे प्रणय पाणी ॥**
**जिव्हारीं घाव भारी । लागे हो नाथा तारी ॥ २ ॥**

( जाते. पडदा पडतो. )

---

## प्रवेश ४ था.

(स्थळः—राजबाग. जयसिंग इकडून तिकडे विचार करीत फिरत आहे.)

**जयसिंगः**—किती नितांत रमणीय देखावा हा !

पद—( चाल—' फूल मंगावो ' ताल—केरवा. )

**बाल कलिका ॥ भ्रमरा संगें ॥ स्वैर करी कशि लीला ॥ धृ० ॥**
**अल्लड तारा ॥ शशिसी नखरा ॥ दावि प्रणय या काला ॥ १ ॥**
**आनंदार्णवि ॥ डुलत विश्व हें ॥ सुंदर समय कसा हा ! ॥ २ ॥**

या चंद्राचीं हीं शीतल किरणं, या तेजोमय तारकांचं मधून मधून गोड चमकणं, आणि या सुंदर फुलझाडांवरच्या कळ्यांचं उमलणं, असा हा निसर्गाचा कौतुकास्पद देखावा पाहून माझं मन अगदीं तल्लीन व्हायला पाहिजे होतं; पण आज चित्तच ठिकाणीं नसल्यामुळं, या साऱ्या गोष्टींचं मला कांहींच वाटेनासं झालं आहे. वचनभंगाचं पाप माथीं बसूं नये, म्हणून इकडं प्रेमळ पित्याची आज्ञा पाळायला जातो खरा, पण तीच आज्ञा पाळीत असतांना, एका नाजुक आणि अल्लड बालिकेच्या मानेवर सपशेल सुरा ठेवायला कारणीभूत होत आहे ! रोहिणी, मी काय करूं ? बाबांच्या संमतीशिवाय विवाहाचं वचन मी आज तुला कोणत्या आधारांवर देऊं ? ( पाहून ) पण हें काय मी पहातों आहें ? इतक्या अपरात्रीं कोण येत आहे इकडं ? अरेरे ! रोहिणी. परमेश्वरा, परमेश्वरा, जिवंतपणींच मरणाच्या यातना मला कां विनाकारण देतो आहेस !

पद—( चाल—‘ सरसीरुहा ’ )

**स्थिति दारुणा करुणा न ये; करुणार्णवा, आशाहता ॥ धृ० ॥ नैराश्य पटलें । निवटोनि गगनां । कांत त्रियामा । कधीं ये पुन्हां ? ॥ १ ॥**

( रोहिणी प्रवेश करते. )

**रोहिणी**:—( स्वगत ) देवा, आतां तारणार फक्त तूंच आहेस. ( उघड ) महाराज मी कां आलें ?

**जयसिंग**—रोहिणी, तूं कां आलीस हें न जाणण्या इतका अज्ञ हा जयसिंग खास नाहीं. पण—

**रोहिणी**:-पण ! पण काय महाराज ? हृदयांत जपून ठेवलेली मूर्ति आपण स्वतःच फोडायला तयार होणार कां ? शुद्ध प्रेमरसानं भरलेला हा प्याला आपण स्वतःच लाथाडून टाकणार का ? महाराज आपण सदय अंतःकरणाचे आहांत, असं सारी दुनिया गर्जत असतांना, एवढी निष्ठुरता

या अभागिनीच्याच वाट्याला कशी आली हो ! महाराज, अगदीं निरपेक्ष बुद्धीनं सांगतें, कीं वडिलांवरचा हा अंध विश्वास, अगदीं साऱ्यांच्या नाशाला कारणीभूत होत आहे हो ! या जन्मीं तरी आपले वडील या लग्नाला संमति खास देणार नाहींत. नाथ, सरळ हृदयाच्या कुमारिकेचा अंत आणखी आतां किती पाहणार अहांत ?

**जयसिंगः**–नको, नको, रोहिणी हा शब्दांचा वर्षाव माझ्याच्यानं आतां मुळींच सहन करवत नाहीं. रोहिणी—

( **चाल**—' प्रेम भावें ' )

**भावबंधन; तुटत अजि हें मम जिवा ॥ कारण जनकाज्ञा॥धृ०॥**
**सरला स्नेह अपुला । शोधी प्रिय दुजा । मज देई शापा ॥ १ ॥**
**स्मृति सदा तव मती । जाचेल अति । दैवाचा दावा ॥ २ ॥**

**रोहिणीः**–नका महाराज, या आपल्या कर्णकठोर वाणीनं या दीन कुमारिकेच्या हृदयाच्या अगदीं चिंधड्या चिंधड्या उडवल्या हो ! नाथ, या आपल्या उदार हृदयाचा सहवास मी विसरणं शक्य तरी आहे कां ? सात्विक प्रणयाचा असा घात करून आपल्याला, आपल्या वडिलांची आज्ञा पाळण्यांत, जरी आज या क्षणाला स्वर्गीय सुख वाटत असलं, तरी महाराज, तें सुख नसून सुखाचा नुसता क्षणिक भास आहे, याची ओळख पुढं पटल्याशिवाय राहणार नाहीं हो. नाथ—

**जयसिंगः**–( स्वगत ) निष्ठुर दैवा, कां असा विनाकारण माझा अंत पहात आहेस ? या इतक्या सरळ हृदयाला उत्तर देण्याची ताकद या जयसिंगांत आहे कां ? छेः छेः; हा मोह मला आवरून धरलाच पाहिजे. ( उघड ) रोहिणी, क्षमा कर. क्षमा कर. आवर ते तुझे अश्रू. तुझ्या नेत्रांतून निघणारा हा ऊष्ण अश्रूंचा मारा, माझी अंतःसृष्टि जाळून अगदीं खाक करीत आहे. रोहिणी, बाबांच्या संमतीशिवाय या पितृभक्त जयसिंगाला कांहीं एक करतां येणें शक्य नाहीं.

**रोहिणी**:--ठीक आहे. नाथ, आपल्याला तरी आपल्या इच्छेच्या पूर्ततेचं सुख लाभूं द्या. पण माझ्या आत्म्याचा उद्धार मी मात्र आतां या आपल्या पवित्र पायापाशीं हा असाच करून घेणार. ( छातींत खंजीर खुपसणार, तोंच जयसिंग हिसकावून घेतो. )

**जयसिंग**:--नाहीं, रोहिणी हें असलें अघोर कर्म मी मुळींच तुला करूं देणार नाहीं.

**रोहिणी**:--पण मला केल्याशिवाय गत्यंतर नाहीं ? आज या क्षणाला माझा हात धरून तुम्हीं जरी मला प्रतिबंध केलात तरी तो क्षणिक आहे. आपण गेल्यावर जिवाचं वाटेल तें करून घ्यायला मी पूर्ण समर्थ आहें. मग कोण या खंजिराला प्रतिबंध करणार ? ( स्वामी प्रवेश करतो. )

**स्वामी**:--मी करणार. जोंपर्यंत या कुडींत प्राण आहे, तोंपर्यंत तुला आणि जयसिंगाला, भलत्या दिशेला मी वाहूं देणार नाहीं. (दोघेहि स्वामींच्या पायावर डोकीं ठेवतात.) उठा; अजाण अर्भकांनो उठा. जयसिंगा, तूं कोणत्या दिशेनें वहात चालला आहेस, याची तुला थोडी तरी कल्पना आहे का ? एका निरपराधी बालिकेच्या कोमल आणि शुद्ध हृदयाची राखरांगोळी करून, दुसऱ्या पाजी आणि हलकट माणसाच्या कालकूट विषानं भारलेल्या हृदयाला, तूं अगदीं तळहातांवर झेलूं पहातोस ?. जयसिंगा, पिता झाला म्हणून काय झालं ! तो जर असले सैतानी खेळ खेळूं लागला, तर त्या सैतानी खेळाचं तूं उच्चाटण करणार, का ढोलकं पिटून त्या खेळाला उत्तेजन देणार ?

**जयसिंग**:--गुरुमहाराज, तें कांहींहि असलं, तरी पण त्यांना मी वचन दिलेलं आहे त्याची काय वाट ?

**स्वामी**:--कसलं वचन घेऊन बसला आहेस ? एका नीच माणसाची विषयवासना तृप्त करून देण्याचं वचन, तुला या दीन रोहिणीच्या आत्मोद्धारापेक्षां जास्त किंमतीचं वाटतं का ? बोल जयसिंगा, तुझ्या निराशाजनक शब्दरूपी विस्तवानें या रोहिणीची पवित्र काया करपून टाकायला तयार

होतोस, का त्या दुष्ट सैतानाची अपवित्र काया स्वतःच्या डोक्यावर घेऊन नाचायला तयार होतोस ?

**जयसिंग**:–पण स्वतांच्या परमेश्वरतुल्य पित्याच्या मानेवर जर आज सुरा ठेवायला मी कारणीभूत झालों, तर गुरुमहाराज, हें जग उद्यां मला काय म्हणेल ? जयसिंग रोहिणीला पाहून भुलला, आणि स्वार्थाला बळी पडून, पित्याच्याहि उज्वल प्रेमाचा बळी यानं दिला; अशा तऱ्हेच्या आरोळ्या चोहींकडून निघाल्याशिवाय राहणार नाहींत. महाराज, हा पितृभक्त जयसिंग, एकच काय, पण असल्या लाखो रोहिणी, माझ्या पित्यावरून ओवाळून टाकील, पण त्यांची आज्ञा मोडणार नाहीं.

**स्वामी**:–( स्वगत ) अरेरे ! काय हा सैतानी पित्यावर अंधविश्वास ! छेः, छेः, असल्या माणसाला प्रत्यक्ष सैतानी कृत्य दिसल्याशिवाय, तो आपलं मत बदलणं शक्य नाहीं. ( उघड ) जयसिंगा, माझ्याकरितां आणि या दीन रोहिणीकरितां तूं एक गोष्ट तरी कर. या वेळीं एका क्षणाचाहि विलंब न लावतां, आत्तांच्या आत्तां ताबडतोब फत्तेगडावर जा. फत्तेगडावर रोज होत असलेले प्रकार, तुला माहीत असते तर गोष्ट इतक्या थराला खास आली नसती. जयसिंगा, तिथला एकदां करुणाजनक देखावा पहा, आणि आपल्या आयुष्याची दिशा ठरव.

**जयसिंग**:–कबूल. पण रोहिणीला मात्र मी येथून ओलीस म्हणून नेल्याशिवाय राहणार नाहीं. बाबांची आज्ञा मला पाळलीच पाहिजे.

**स्वामी**:––जयसिंगा, रोहिणीला येथून ने, पण फक्त एका अटीवर. फत्तेगडच्या प्रकरणाचा निकाल लागेपर्यंत, रोहिणी मानसिंगाच्या दृष्टीला पडतां कामा नये.

**जयसिंग**:––कबूल. डोळ्यांची खात्री पटल्यावर, एका शब्दानं सुद्धां मी आपल्याला कोणत्याहि बाबतींत दुखविणार नाहीं.

**स्वामी**:—ठीक आहे. आत्तांचा सारा वृत्तान्त दीपसिंगाच्या कानावर घाला, आणि त्याचा निरोप घेऊन कार्याला लागा. (जातात.) पडदा पडतो.

## प्रवेश ५ वा.

[ **स्थळ**:—फत्तेगडच्या समोरील एक रस्ता—मानसिंग प्रवेश करतो. ]

**मानसिंगः**—( स्वगत ) हेरांनीं आणून दिलेली बातमी एकंदरींत खरी ठरणार तर ! दीपसिंगा, माझा डाव हाणून पाडण्याकरितां, सफाईनं केलेली ही तोड, तुला पचेल, अशी कल्पनासुद्धां डोक्यांत आणूं नकोस. रोहिणीच्या प्रेमाच्या जाळ्यांत जयसिंग खात्रीनं गुरफटला जाईल, आणि पुढं लढाईला त्याची आपल्याला चांगलीच मदत होईल, या कल्पनेच्या जोरावर दीपसिंगा, तूं माझ्याशीं बेफामपणानं वागूं पहातो आहेस, पण हरामखोरा लक्षांत ठेव, कीं कळीकाळाची माळ, जेव्हां या मानसिंगाच्या गळ्यांत पडेल, त्याचवेळीं रोहिणीची माळ, जयसिंगाच्या गळ्यांत पडली तर पडेल. जोंपर्यंत माझ्या स्वभावाला मी खरखीत निखाऱ्याचं स्वरूप दिलेलं नाहीं, तोंपर्यंत स्वैर कल्पनांचे किल्ले अगदीं मनसोक्त बांधून घ्या; पण त्याच किल्ल्यांची राख शेवटीं कपाळीं लावून घेण्याची पाळी येईल, ही जाणीव मात्र अंतःकरणांत जिवंत ठेवा म्हणजे झालं. अरे, पण बोलतां बोलतां मी माझ्या इष्ट स्थळीं केव्हांच येऊन पोहोंचलों म्हणायचा. या समोरच्या फत्तेगडावर ठेवलेल्या साऱ्या लावण्यलतिका, मला आतां हळुहळूं वश होऊं लागल्या आहेत. पण एक मात्र अगदीं कमालीची हट्टी भेटली आहे. सगुणेच्या रक्तवर्ण अधरांचा आस्वाद मिळण्याकरितां, काल तिच्या पोटच्या पोराचा सुद्धां या कट्यारीनं खून केला, पण शेवटीं साऱ्याच आशेला हरताळ फांसावा लागला. ठीक आहे, हट्टी सगुणे, काल पोराचा खून केला, पण वेळ आली तर तुझाहि खून करायची आज माझी तयारी आहे. हा पहा आलाच गड—

[ पुढील सीनः—फत्तेगड—मोठ्या दरवाजाजवळ तरवारींचा पहारा. पहारेकरी मानसिंगाला मुजरा करून निघून जातात. दाराजवळ मानसिंग जातो, तोंच मनोरमा दारांत एकदम अडवते. ]

**मनोरमाः**--हो, हो, हो पण,---कां ? आज अगदीं रागाऊनसं येणें व्हायचं ?

**मानसिंगः**-पण या गोडमुखचंद्रमाच्या मधुर हास्यापुढं आमचा राग टिकेल तेव्हांना ? बरं पण इतक्यांतच चाललीस आणि शंकरराव कुठं आहे ?

**मनोरमाः**—शंकरराव मघाशींच निघून गेले आणि आतां मी सुधां पण निघालेंच हं—

**मानसिंगः**--कां ?

**मनोरमाः**--केव्हांची वाट पाहून पाहून थकलें. म्हटलें आज स्वारींची लहर लागते आहे कीं नाहीं ?

**मानसिंगः**--मनोरमे, ज्या ज्या वेळीं तूं इथं असशील त्या त्या वेळीं माझी लहर लागलीच पाहिजे. बरं पण, घरीं चाललीस नाहीं कां ? आणि एकटीच कशी येथून जाणार ? थांब, तुझ्या सोबतीला कोणी तरी देतों.

**मनोरमाः**--नको गडे, मी आपली एकटीच जाईन.

**मानसिंगः**--बरं बुवा, एकट्या जा; पण हा हार मात्र सोबतीला जरूर पाहिजे. ( मोत्यांचा हार तिच्या गळ्यांत घालतो. ) सुकुमार तनुला या हाराचं ओझं तर नाहींना व्हायचं ?

**मनोरमाः**—( लाजून ) पुरे, पुरे,—हं,—

**पद—( चाल—**' सत्य वदे वचनाला ' )

**जीव गडे भुलला हा माझा ॥ कांत कशी दिपवी नय-**
**नांना ॥ धृ० ॥ चित्त हिराउनि । पेटित देखत ।**
**ठेविन हृदयांतरि मी याला ॥ १ ॥**

**मानसिंगः**—ओ, हो ! वारे लज्जत !

**मनोरमाः**—येतें गडे.

**मानसिंगः**—या, या हं—( मनोरमा निघून जाते. मानसिंग आंत जातो. गडाच्या पुढील गच्चीवर, सगुणा आपलें मेलेलं मूल उराशीं घट्ट धरून उभी आहे. )

पद—( चालः—' मज जन्म देई माता ' )

**सगुणाः--**

**मम हंस स्वर्गि नेला । कां ईश कोपला ॥**
**नच दूध बाळ प्याला । खंजीर तोंच घुसला ॥ धृ० ॥**
**कुलदीप हो विझाला । आधार तोचि मेला ॥**
**देवा हो घात केला । उघडी पडे ही अबला ॥ १ ॥**

पुरता गळ्याला फांस लावलास, दैवा, अगदीं पुरता लावलांस रे ! राजसा काय झालं हें अखेर ! दुष्ट दैवा, एका गरीब निःसहाय्य अबलेच्या मांडीवर, सुखानं स्तनपान करणाऱ्या तिच्या कोंवळ्या अर्भकाला तूं कसं रे, पटकन् उचलून नेलंस ! मी आतां कुणाच्या—तोंडाकडं बघूं ! लाडक्या, आई ही मुलाला सुख देण्याकरितां असते रे ! पण या अभागिनीच्या हांतून तुला पुरतं दूध सुद्धां प्यायला मिळालं नाहीं. माझ्या बाळाच्या ओंठावरचा, दुधाचा थेंब वाळतो ना वाळतो, तोंच त्या मांगानं एकदम कशी रे कट्यार खुपसली ! माझ्या पातिव्रत्याचं रक्षण करतां करतां माझा बाळ दमला, आणि अखेर देवलोकीं देवांची मदत मागायला निघून गेला. राजसा, आपल्या लहान वयांतच एवढं शौर्य गाजविलंस खरं, पण मला मात्र अगदीं लवकर अंतरलास रे ! बाळा, तुझा वियोग सहन करायची सहनशीलता, माझ्या अंगांत मुळींच नाहीं रे ! स्वर्गात तुझ्याबरोबर मी सुद्धां येतें, म्हणजे माझ्या पातिव्रत्याचं कायमचं तरी रक्षण होईल. चल–बाळ–हाय रे दैवा ! ( कड्याखालीं उडी घेणार तोंच मानसिंग एकदम हात पकडून मागं खेंचतो. )

**मानसिंगः**–या मानसिंगाच्या जबरदस्त पकडींतून सुटण्याची, प्रत्यक्ष परमेश्वराची सुद्धां छाती नाहीं. सगुणं, अशी बेफाम होऊं नकोस. तुझ्या कारट्याचा निकाल लावणारी ही कालची मूर्तिमंत लालकट्यार, कालच्या इतक्याच तेजस्वी मुद्रेनं, आज तुला तुझ्या स्वतःबद्दल जाब विचारीत आहे. या रक्तानं माखलेल्या कट्यारीकडं नीट डोळे उघडून पहा, आणि

अजून आपला हेका सोड. सगुणे, माझ्या हट्टी स्वभावाचा अंत पाहण्याचं साहस करूं नकोस. पहा, या लालभडक कट्यारीकडं एकदां शेवटचं पहा; आणि बऱ्या बोलानं तुझ्या नवऱ्याच्या हक्काचं हें तेजोहीन कुंकूं पुसून माझ्या—

**सगुणाः**–( एकदम खवळून ) सैतान ! कुणाला दाखवतोस या कट्यारीचा धाक ? या सगुणेचंच रक्त त्या कट्यारीला काल लागलेलं आहे. माझ्या बाळाचं रक्त, तेंच माझं रक्त ! या सगुणेच्या देहांत रक्ताचा एक थेंब सुद्धां या वेळीं सापडणं शक्य नाहीं. नीचा अरे, ज्या स्त्रीनं आपलं उज्वल व पुण्यप्रद पातिव्रत्य कायम राखण्याकरितां पोटचा गोळा गंगार्पण केला, ती स्त्री तुझ्यासारख्या नामर्दांच्या धमकावणीचं, नुसतं कौतुकच करीत राहील.

**मानसिंगः**—नामर्द ? कोण नामर्द ? मी ! स्वैर सुटणारी ही जिभली खाडकन मुळापासून उपटून हातांत दिली असती, पण कृतसंकल्प सिद्धीस न्यायचा आहे, म्हणूनच कांहीं काल या बाबतींत मला विवेक करावा लागत आहे. सगुणे, परत बजावतों कीं तीराच्या तडफेनं सुटलेला हा मानसिंगाचा बोल, थेट हृदयाला खोल जखम केल्यावांचून राहणार नाहीं.

**सगुणाः**—मानसिंगा, या पतिव्रतेचा एक एक बोल सुद्धां तुझ्या बोलांच्या दसपट जास्त किंमतीचा आहे. सार्वभौम सत्तेचा नसता फाजील अभिमान बाळगूं नकोस. तुझ्यासारख्या सैतानाच्या सत्तेपुढं, जरी शहाण-पण टिकत नसलं, तरी पण उज्वल सत्यापुढं, तुझी ही सत्ता केंव्हांहि फिक्की पडल्याशिवाय राहणार नाहीं. नराधमा, ज्या ज्या गरीब जीवांना तूं धाय मोकलून रडायला लावलेलं आहेस, ती सारी दुःखी जनता तुझ्या प्रेतावर उगवलेलं हिरवं गवत अगदीं आनंदानं तुडवून तुझा सूड घेतल्या-वांचून राहणार नाहीं.

**मानसिंगः**—बस् झाली ही शब्दांची देवघेव. गडावरून खालीं उडी घ्यायला तूं मुळींच कमी करणार नाहींस. अशी फरफटत गडाच्या बाहेर

नेतों. ( वरून खालीं, गडाच्या बाहेर आणतो. ) काय वाटतं तुला ? तुझ्या या जिभेच्या पट्टयाच्या माऱ्यानं या मनगटांतील सामर्थ्य कमी होईल होय ? नीतिमत्ता शिकवणाऱ्या बेशरम पोरी, तुझ्या नीतिमत्तेच्या कोरड्या डौलाच्या डोलाऱ्याला, माझ्या प्रखर दृष्टीच्या एकाच फेकीनं जाळून खाक करीन, आणि त्याच्या रक्षेची काळी टीट, माझ्या तेजस्वी पराक्रमाची साक्ष म्हणून, या लाल कुंकवाच्या जागीं अशी लावीन तरच नांवाचा मानसिंग. पातिव्रत्याच्या भुक्कड कथांना, जर आजपर्यंत मी भीक घातली असती, तर आज या विजयनगरच्या सिंहासनावर जो मी सिंहासारखा गरजतों आहें, तें माझं गरजणं अशानं केव्हांच नामशेष होऊन, मी नुसता एक नामधारी बनलों असतों. पण मानी सगुणे, दुनियेंतले सारे डाव हा मानसिंग अगदीं लहानपणापासून चांगले जाणतो आहे; आणि त्याच पूर्वतयारीवर हें सार्वभौमत्व पटकावलं आहे समजलीस. चल बोल; संमतीचा एक शब्द बोल, आणि रागानं लाल झालेल्या या कट्यारीला संमतीच्या शब्दांचा नैवेद्य दाखवून शांत कर.

**सगुणा**:—रक्ताचा नैवेद्य कालच दाखवून कट्यारीला शांत केलेलं आहे. पण आज तुझ्या रक्ताच्या नैवेद्याचा मात्र खोळंबा झालेला आहे.

**मानसिंग**:—( स्वगत ) बस्; अखेर झाली. ( उघड ) मस्तवाल पोरी, नीट डोळे उघडून कुणाच्या रक्ताचा नैवेद्य दिला जातो, तें पहा.

[ कट्यार तिच्या छातींत खुपसणार, तोंच चोरदरवाज्यांतून जयसिंग धांवत येऊन मागच्या मागें कट्यार हिसकावून फेंकतो. ]

**जयसिंग**:—नैवेद्याचा निवाडा करायला, परमेश्वर पूर्ण समर्थ आहे· अरेरे ! कोणत्या शब्दानं आतां तुम्हांला हांक मारूं ?

**मानसिंग**:—(स्वगत) साराच घात झाला ! पण या प्रकरणाला अजून निराळं स्वरूप देतां येईल. (उघड) जयसिंगा, जयसिंगा, अगदीं बिनधोकपणानं मला बाबाच म्हणून हांक मार. आत्तांचं माझं हें कृत्य बाहेरच्या देखाव्यानं तुला सैतानी वाटणं अगदीं साहजिक आहे. पण खरा प्रकार



मानसिंगः–कुणाच्या रक्ताचा नैवेद्य दिला जातो तें नीट पहा. [पृष्ठ ४४.

अगदींच उलट आहे. जयसिंगा, ही बायको इतकी बदचालीची आहे कीं, स्वतःचं पाप झांकण्याकरितां, या गडाच्या बाजूला, ही या पोराचा खून करीत होती. न्यायाचा होत असलेला हा खून माझ्याच्यानं पाहवला नाहीं. म्हणून हा अन्यायाचा खून, प्रजेचा पालनकर्ता या नात्यानं मला करणं अगदीं भाग होतं. [सगुणा "हाय रे दैवा" म्हणून खालीं पडते व मरते.]

**जयसिंग:**—वा रे पालनकर्ता ! मेहरबान, आतां घडलेला सारा प्रकार या जयसिंगानं आपल्या डोळ्यांनीं स्वतः पाहिलेला आहे समजलांत. आपल्या मायावी शब्दांचा परिणाम होणारा काल आतां पार निघून गेला आहे हें पक्कं लक्षांत ठेवा. अरेरे ! अमावास्येच्या काळ्याकुट्ट अंधारालाहि तुमच्या कारस्थानाचा अंधःकार लाजवील. बाबा, आजपर्यंत मला नामधारी आणि व्यवहारशून्य बाहुलं बनविण्याकरितां, सुंदर कल्पनांच्या जाळ्यांत अगदीं जखडून टाकलंत, आणि स्वैरपणानं सैतानी धुडकूस घातलांत; परमेश्वराचं अस्तित्व दुनियेंत जिवंत आहे, या तत्त्वाची जाणीव झुगारलीत, आणि म्हणूनच सात्त्विकपणाचा हा बनावट झिरझिरीत पडदा फाटून, आंतला काळाकुट्ट अंधःकार आतां अगदीं स्पष्टपणें दिसूं लागला आहे.

**मानसिंग:**—जयसिंगा, खोट्या संशयाच्या भरीस पडून, आयुष्याचं नुकसान करून घेऊं नकोस. आज्ञेप्रमाणं रोहिणीला आणलीस कीं नाहीं तें सांग अगोदर.

**जयसिंग:**—माझ्या अज्ञानपणांत, आपल्या सैतानी आज्ञेला बळी पडून, मी रोहिणीला इथं आणली, पण आतां या घटकेला सज्ञान झालेला जयसिंग, तुमच्यासारख्या बदफैली माणसासमोर, रोहिणीला उभी करील ही कल्पनासुद्धां डोक्यांत आणूं नका. ( सगुणेजवळ जाऊन नीट पहातो; व दुःख प्रदर्शित करतो. )

**मानसिंग:**—मूर्ख पोरा, विजयनगरांतला कोंपरान् कोपरा धुंडून रोहिणी हुडकून काढीन. ( स्वगत ) बिथरलेल्या या जीवाला याच वेळीं कैद केली पाहिजे. काय करूं ! या फत्तेगडचा ठावठिकाणसुद्धां या जयसिंगाला

माहित नव्हता, आणि आजच अचूक तो माहित तरी कसा झाला ? विरुद्ध चळवळ करणाऱ्या स्वामीसारख्या टवाळमंडळींनींच हा डाव साधला असला पाहिजे. ठीक आहे. साऱ्यांची हाडं पिचून काढीन तरच नांवाचा मानसिंग ! ( उघड ) जयसिंग, राज्यकारभाराचं गाडं सुरळीत चालण्याकरितां मला नाइलाजानं तुला कैद करावें लागत आहे. कोण आहे रे पलीकडं ? ( दोन सरदार येतात ) धाकट्या सरकारांच्या हातांत कड्या टाकून या गडावरच्या तुरुंगांत घेऊन चला. ( सरदार पुढं होतात पण दचकतात. )

**जयसिंगः**—सरदारहो, दचकूं नका. बेलाशक गिरफदार करा. आजपर्यंत तुमचे हात, मला धाकटे महाराज म्हणून मुजरा करायला कारणीभूत होत होते. तेच हात आज मला गिरफदार करायला जरी पुढं सरसावत आहेत, तरी यांत तुमचा दोष नसून, राष्ट्रावर आसुरी सत्ता गाजविणाऱ्या या सैतानाचा तो दोष आहे. अरेरे !

**पद—( चालः—'**सोडुनि धृतिला.'**)**

**दाउनि कृतिला, लाज ना महीकांत ? ॥धृ०॥ जनतेस,**
**स्वकुलास; अवनत करित; झडकरीं कृति या ॥**
**कृतिला ॥ १ ॥ सत्ता प्रखरें दावि । दुनियेसि करि**
**त्राहि ! ॥ झणीं तेज प्रभु दावि । चरर चरर् ! ॥ २ ॥**

**मानसिंगः**—बस्; एकदम गिरफदार करा. ( सरदार कैद करतात. ) जयसिंगा, परिस्थितीकडं नीट लक्ष दे, डोळ्यांतून अश्रू आल्यावांचून राहणार नाहींत.

**जयसिंगः**—माझ्या डोळ्यांतून अश्रू ? हंः ! मानसिंग महाराजांचं हें नामधारी बाहुलं आतां इतकं टणक झालेलं आहे, कीं त्यांतून आतां अश्रूंचा एक थेंब तर येणें शक्यच नाहीं; पण या बाहुल्याला नाचविणाऱ्या सूत्रधाराच्या डोळ्यांतून मात्र अश्रू आल्यावांचून राहणार नाहींत. बाबा, तुमच्या डावपेचांचा प्रभात काळ आतां केव्हांच नाहींसा झालेला

आहे, हें लक्षांत ठेवा. हट्टीपणाला बळी पडून आणखी वाटेल तितके लोक जरी तुम्हीं तुरुंगांत लोटलेत, तरी पण मनाशीं खूण गांठ बांधून ठेवा, कीं त्या तुरुंगातल्या कैद्यांची तपश्चर्या, तुमचं हें सैतानी वैभव, पार धुळीला मिळविल्यावांचून राहणार नाहीं. अरेरे ! बिन अपराधी माणसाला, तो केवळ आपल्या चैनीच्या आड येतो, म्हणून त्याच्या हातांत शृंखला टाकून, त्याच्या स्वयंभू स्वातंत्र्याला तुम्हीं हरताळ फासतां, पण एक परमेश्वरी अंशाचा यांत आपण उपमर्द करीत आहांत, ही जाणीव थोडी तरी अंतःकरणांत असते का ? बाबा, परमेश्वराच्या उपमर्दाचं कडकडीत प्रायःश्चित्त, तुमचं कर्मचक्र तुम्हाला दिल्यावांचून राहणार नाहीं.

**मानसिंगः**—शाब्दिक चऱ्हाटाचा फांस, स्वतःच्या गळ्याभोंवतीं बसल्यावांचून राहणार नाहीं.

**जयसिंगः**--बाबा, माझ्या गळयाला फांस बसण्यांतच राष्ट्राचा उदय आहे; पुन्हा बजावतों, माझ्या गळ्याला फांस बसण्यांतच राष्ट्राचा उदय आहे; गळयाला फांस बसण्यांतच राष्ट्राचा उदय आहे ! ! ! ( पडदा पडतो. )

## अंक २ रा समाप्त.

# अंक ३ रा.

## प्रवेश १ ला.

[ **स्थळ**:—विजयानगरांतील एक रस्ता–खांसाहेब, शंकररावाला फरफर ओढीत आणतो. ]

**खांसाहेब**:–चोर किदरका !

**शंकरराव**:–अहो, पण–अहो--प--ण–हें काय खांसाहेब ? असं ओढतां काय मला ? अहो पण–भररस्त्यांत काय हें असं ? कोणी पाहिलं तर काय म्हणेल ? जरा शहाणपणानं घेतलं तर—

**खांसाहेब**:–चूप. बकेमत जादा. पहिले मेरी अंगुठी रख द्यां; शहाजोग किदरका ! बमनीकावा बतलाता क्या ह्यां ? नालायक, तेरेको तो अब अच्छी तऱ्हेसें छिन लेऊंगा. बेवकूफ किदरका ! चल लाव अंगुठी.

**शंकरराव**:–अहो पण देतों कीं, पण–अहो पण असं हिसकतां कां विनाकारण ? माझ्या बरोबर घरापर्यंत चला; देतों तुमची अंगठी तुम्हाला परत. यावेळीं जर नाहीं जवळ, तर देऊं तरी कशी ? तुमच्या सारख्या शहाण्या माणसानं भररस्त्यांत अशी धिंगामस्ती करायची म्हणजे काय ?

**खांसाहेब**:–लेकिन् उस दिन क्यों ठकाया ?

**शंकरराव**:—आतां काय सांगूं तुम्हाला खांसाहेब ! अहो खरोखर त्या दिवशीं मनोरमा आली नव्हती; इतकंच काय, पण तुमच्या जिवांकरितां मी एक हेलपाटासुद्धां तिच्या घरापर्यंत टाकला बरं. पण काय !

**खांसाहेब**:–फिर हुवा क्या ये तो बोल ?

**शंकरराव**:–( सुस्कारा टाकून ) हं ! आतां काय सांगायचं तें ! छेः छेः ! फार शिव्या हसडल्या हो त्या अवदेसेनं !

**खांसाहेब**:–क्यों ?



जयसिंगः—माझ्या गळ्याला फास बसण्यांतच राष्ट्राचा उदय आहे. [पृष्ठ ४०

शंकरराव:- ती म्हणाली कीं " मी काय कोणी नायकीण आहे, कां अशी तशी आहे, तर वाटेल त्याच्याशीं बोला खिदळायला येऊं ? " आणि पुढं काय म्हणते अवदसा, कीं " लाज नाहीं वाटत त्या मेल्या बोकडाला, घरत्या बायकोला ही अशी अंगठी द्यायला ? माझ्या जर मेला समोर आला असता, तर टाळक्यापासून पायापर्यंत चांगलं खेटरानं बड-वलं असतं " ( सुस्कारा टाकून ) आतां काय बरं करायचं खांसाहेब ? अगदीं अस्सं बोलली हो सारं ! अगदीं आईबापाची ( स्वगत ) तुझ्याच म्हणा ( उघड ) शपथ घेऊन सांगतों, कीं त्या दिवशीं तिच्या जवळ तुमची इतकी मी शिफारस केली, कीं कांहीं विचारूं नका. तिला सारखं बजावलं कीं खांसाहेबांना तूं खूष कर, सोन्यामोत्यांच्या दागिन्यांनीं ते तुला नुसती मढवून काढतील. पण अं, हं ! तरी पण खांसाहेब, इतक्या सोन्यामोत्यांच्या दागिन्यांचं नांव जेव्हां काढलं, तेव्हां चेहरा एकदम मला खुलल्यासारखा दिसला. अहो बायकांच्या जातीचं असं हें नेहमीं चालायचंच. मनांतून हवं असलं, तरी बाहेरून मला नको, मला नको, म्हणून मनुष्याला अगदीं खूप घोळवायचं; आणि मागून मात्र कांहीं एक न बोलतां, त्या माणसांकडून सारं यथास्थित करून घ्यायचं. अहो त्यांच्यांतले हे अगदीं ठोकळ अडाखे आहेत; पहा बुवा; आहे हें असें प्रकरण आहे, हो—त्यांत आणखी आंत बाहेर कशाला ? तुमच्याच जिवांकरितां एवढं झटायचं; आणि मला हो काय करायचं आहे त्या आंगठीशीं ? ( स्वगत ) फांसा तर नेमका टाकला आहे, दाखवतों लेकाला ब्राम्हणी कावा.

खांसाहेब:—( स्वगत ) अब क्या करना? कुचभी हो लेकीन ये दुर्गा-दासकी खुपसुरत एकदफे मिलनाहि चाहि है. ( विचार करून ) बस्, बस्, अब ऐसाहि करतां हूं ! ( उघड ) अच्छा, शंकरराव, फिर तुम क्या करना चहाते हो ?

शंकरराव:—तुमने बोलना और वैसा हमने करना !

खांसाहेबः–क्यौंजी मनोरमाको, कुछ थोडा डागडागिना और थोडी रक्कम दियी तो ?

शंकररावः–बस्, बस्, खांसाहेब, शेवटीं तुम्हाला मीं हेंच सांगणार होतों. अहो दागदागिना दिल्यावर ती काय येणार नाहीं, तिचा बाप येईल.

खांसाहेबः–नालायक, उसके बापकी क्या मुझे जरुरत है ?

शंकररावः–ह्यः ह्यः ! तसं नव्हे हो, पण आपलं सांगितलं इतकंच.

खांसाहेबः–फिर अब ऐसा करो; थोडे देरसे मेरे मकानको आव; और वहां तुमको थोडी रक्कम और डागडागीना मैं देताहूं; वह सब उसको पहूंचादेना; और फिर क्या कहती है, वह सब कहनेके लिये, जलदी मेरे मकानको फिर आना. लेकिन् काम इतना बेमालूम करना—

शंकररावः–( स्वगत ) के तुमको उसका पताभी न लगजाय. ( उघड ) सब मामला अब ठीक कर देता हूं.

खांसाहेबः–अच्छा; जातां हूं मैं. जलदी आना. ( खांसाहेब जातो. )

शंकररावः–(खूप हंसतो) आतां या वेड्या पीराकडून दागदागिना आणि रक्कम उपटतों; आणि तिकडून मनोरमेला घरांतून उचकावतों, आणि करतों कायमचं यःपलायन ! महाराजांच्या नजरेखालीं परवां मनोरमेला घातलीच आहे, थोडं बहुत तरी ती महाराजांकडून आणीलच. बस्–झालं ! ! मी आणतों खांसाहेबांकडून आणि ती आणील महाराजांकडून; दोन्ही जिनसा एक करून, आणि आम्हीं दोघें एक होऊन, कुठं तरी लांब जाऊन आयुष्यभर मजा मारीत बसूं झालं. हो; एवढं मिळाल्यावर मग कशाला या विजयनगरांत रहायचं ? बाकी दुर्गादास मात्र आतां अगदीं चांगलाच जिकीरीस आला आहे. एकाद दिवशीं राजेश्री चांगला अफूचा गोळा सेवन करून स्मशानांत अगदीं स्वस्थ लौकरच पडतील. पण त्यांची विलासप्रिय फटाकडी मात्र अस्मादिकांबरोबर इकडं अगदीं मनमुराद विलास भोगीत राहील. अहाहा ! परमेश्वरा ! तूं खरोखर दयाळू, मायाळू, कनवाळू, आणखी आतां किती विशेषणांनीं तुला मी आळवूं ? तुझ्यासारखा

तूंच एवढ्यावरच तुला भागवितों. आमचं हें बिंग जर यदाकदाचित् बाहेर फुटलंच, तर वेष पालटून मी होईन एकाद्या मठाचा स्वामी आणि ती होईल माझी सहशिष्यीण ! वा ! फारच रमणीय जोडी ! ! ( जातो. )

( पडदा पडतो. )

## प्रवेश २ रा.

[ स्थळ—स्वामींचा मठ—स्वामी, व आजूबाजूला दुःखी नागरिक. ]

स्वामी:—हतभागी जीवांनो, थोडी बहुत आशेला जी जागा होती, ती सुद्धां दैवाला पाहवली नाहीं. आमच्या प्रयत्नांना थोडंबहुत यश येऊन, जयसिंगाचा अंधविश्वास उडाला खरा, पण सर्वांच्या फुटक्या नशीबानं ऐनवेळीं उचल खाऊन, त्यांचा तुरुंगवास पहाण्याचं नशिबीं आलं. नागरिकांनो, तुमच्या करुण कहाणीच्या शाब्दिक आघातानं, माझी सारी चेतनाशक्ति जागच्याजागीं अगदीं खिळल्यासारखी झालेली आहे. तुम्हांला एक गोष्ट मात्र मी बजावून ठेवतों, कीं तुमचा राग जरी किती अनावर झाला, तरी पण तुम्हीं दंगा करायला मुळींच प्रवृत्त होऊं नका. दंगा करून उपयोग व्हायचा तर एका बाजूलाच राहील; पण पुढच्या साऱ्या उपायांना मात्र कायमचे पारखे व्हाल. तुमच्या हालांची मला कल्पना नाहीं, असं मुळींच समजूं नका. तुमच्या पालनकर्त्यांनं जरी शीलाला हरताळ फांसला, तरी पण शीलरक्षणाच्या जबाबदारीची जाणीव, तुमच्या अंतःकरणांत इतकी प्रखर असली पाहिजे, कीं प्रसंगीं तुमची प्राणज्योत जरी मालवली गेली, तरी दिव्य शीलाची तेजस्वी ज्योत, अखेरपर्यंत प्रज्वलितच असायला पाहिजे. अनेक हत्यांच्या पोटींच दिव्य स्वातंत्र्य जन्माला येत असतं, ही जाणीव अंतःकरणांत सदैव जिवंत ठेवा. आजपर्यंत जसे निष्ठुर दैवाचे खेळ सहन केलेत, तसे आणखी कांहीं काल केल्यावांचून हाल बंद होणार नाहींत असं स्पष्ट दिसत आहे. जा, माझ्याच्यानं तुमची

ही दीन मुद्रा मुळींच आतां पाहवत नाहीं. अरेरे ! परमेश्वरा ! हा सैतानी संक्रांत काल, दीनदुनियेचे आणखी किती हाल करणार आहे रे ! !

( नागरिक जातात. दोन सरदारांसह दिवाणजी प्रवेश करतात. )

स्वामीः–या दिवाणजी.

दिवाणजीः–गुरुमहाराज, माझ्या अल्पबुद्धिनुसार धाकट्या महाराजांना सोडविण्याचा एक उपाय शोधून काढला आहे, आणि तो सांगण्याकरितां, पहिल्या प्रथम मी आपल्या चरणाजवळ आलेला आहें.

स्वामीः–अहाहा ! दिवाणजी शाबास !

दिवाणजीः–यश येण्यापूर्वी शाबासकीला मी मुळींच पात्र नाहीं. हे पहा, हे दोन सरदार अगदीं जिवाला जीव देणारे आहेत. फत्तेगडांत महाराजांच्या तुरुंगावर ज्या दोन सरदारांचा पहारा आहे, त्या पहाऱ्यावर या दोघांची नेमणूक करणं माझ्या अधिकारांतली गोष्ट आहे, म्हणून म्हणतों, आतां अगदीं या क्षणाला पहारा बदलून, महाराजांची सुटका हां हां म्हणतां करून टाकतों. महाराज सुटले, कीं ज्या ठिकाणीं त्यांनीं रोहिणीला ठेवलेली आहे, त्या ठिकाणीं ते एकदम जाऊन रोहिणीसकट विलासपुरला तडक निघून जातील.

स्वामीः–अहाहा ! दिवाणजी, कोणत्या शब्दांनीं मी आतां तुमचे आभार मानूं? तुमचा हा उपाय यशस्वी होईल. पण तुम्हांला मात्र तो अपायकारक झाल्यावांचून राहणार नाहीं. राजकारणांतले नाजुक डाव सहज लीलेनं खेळणारा मानसिंग या बाबतींत तुमचा संशय खात्रीनं घेऊन, वेळप्रसंगीं तुमचा जीव—

दिवाणजीः–कबूल आहे. यामुळं माझा जीव धोक्यांत येईल, ही गोष्ट महाराज मी चांगली जाणून आहें; पण हा म्हातारा मोठ्या भाग्याचा कीं, माझ्यासारखा एक क्षुल्लक जीव, आज दुःखी जनतेचा पाठिराखा सोडवायला कारणीभूत होत आहे. माझ्या जीवाच्या या सांडणुकीनं, विजयनगरला जर स्वातंत्र्य मिळालं, तर माझ्या प्रेताला तरी स्वातंत्र्यसूर्याच्या

उज्वल प्रकाशाचा लाभ मिळेल, आणि देहविरहित जीवंत असलेला माझा आत्मा, परमेश्वराच्या पायाशीं, महाराजांना उदंड आयुष्य दे, म्हणून याचनेचीं सारखीं पारायणं करीत राहील.

स्वामी:-( त्याला कडकडून भेटतो ) अहाहा ! दिवाणजी, तुमच्या सारख्या निःस्वार्थवृत्तीच्या जीवांचा नैवेद्य परमेश्वराला दाखविल्यावर, दयावंत परमेश्वर दयेची खैरात केल्यावांचून राहणार नाहीं. सरदारहो, काम अगदीं बेमालूम करा, आणि भावी उज्वल यशाचे वाटेकरी व्हा.

( जातात. पडदा पडतो. )

---

## प्रवेश ३ रा.

[ स्थळ:-रस्ता. रत्नाकर व दुर्गादास प्रवेश करतात ]

रत्नाकर:-किती खुळा आहेस रे तूं ! माझी मुळींच कल्पना नव्हती कीं तूं इतका वैतागून अगदीं आत्महत्येपर्यंत पाळी आणशील म्हणून. चल घरीं; वेडा कुठला.

दुर्गादास:-रत्नाकरा, माफ कर आतां. आजपर्यंत तूं या दुर्गादासाला पाठच्या भावाप्रमाणं वाग्विलास, त्याबद्दल तुझा मी अत्यंत ऋणी आहें. पण यापुढं मात्र आतां माझं मन वळविण्याच्या भानगडींत पडूं नकोस.

रत्नाकर:-अरे, पण असा भ्रमिष्ठासारखा काय करतोस ? वेड तर नाहीं लागलं तुला ? हें बघ, आज मनोरमा वहिनींना मी अखेरचे कळकळीचे दोन शब्द सांगून पहाणार आहें.

दुर्गादास:-अनुभवशून्य प्राण्या, अरे ज्या स्त्रीला नवरा म्हणजे हातांतलं एक खेळणं वाटतं, अशा स्त्रीला आतां सन्मार्गी लावण्याचा नाद सोड, आणि माझ्याही जिवाची आशा सोड. रत्नाकरा, तुझं अद्याप लग्न झालेलं नाहीं, तेव्हां माझ्या कडवट अनुभवाचे दोन शब्द तुला सांगतों ते नीट सावधान चित्तानं ऐक. रत्नाकरा, बायकोला वळण

लावायची फक्त एकच वेळ असते, आणि ती म्हणजे, ज्यावेळीं ती नवी नवरी म्हणून सासरीं येते ती वेळ. रत्नाकरा, त्यावेळीं तिला या नटव्या-दुनियेंतील ढंगांची मुळींच कल्पना नसते, आणि योग्य वळण लावायची हीच खरीखुरी वेळ असते. पण जर कां ही वेळ टळली तर मग प्राण गेला तरी संसाराचा मेळ बसायचा नाहीं, हें लक्षांत ठेव. पहिल्या प्रथम या बायका, नवऱ्याला आपल्या मुठींत घेण्याकरितां इतका आटोकाट प्रयत्न करतात, कीं दुबळ्या मनाचा नवरा त्यांच्या त्या गोड शब्दांना इतका हुरळून जातो, कीं पुढं त्या ज्या स्थितींत त्याला ठेवतील, त्या स्थितींत अगदीं नंदी बैलासारखा तो राहतो. रत्नाकरा, या अवदसा पुढं इतक्या छटेल होतात, कीं बाहेरच्या बाजारबसव्यांत आणि यांच्यांत काडीइतकं सुद्धां अंतर रहात नाहीं. मनोरमेला वळण लावायची वेळ आतां पार निघून गेली आहे. मनोरमा आतां इतकी बेइमान झाली आहे, कीं एखादी नायकीण सुद्धां आपल्या ठेवलेल्या यजमानाशीं इतकी बेइमान होणार नाहीं. अरे, जी राजरोस वाटेल त्या तरुण पुरुषांबरोबर, मग तो जातीचा ब्राह्मण असो, मराठा असो, मुसलमान–अरेरे–रत्नाकरा, अखेरीस इतके दिवस अंतःकरणांत कोंबून ठेवलेल्या, या कुळाला कलंक लावणाऱ्या गोष्टी, आज चित्तक्षोभानं तुझ्याजवळ एकदां ओकून टाकल्या. चल जाऊं दे; कोळसा उगाळावा तितका काळाच.

रत्नाकरः–तूं आणखी जरी कांहीं सांगितलेंस तरी हे तुझे कमकुवतपणाचे विचार, आपल्याला बुवा साफ नापसंत आहेत. तें कांहीं नाहीं. इतक्या थराला ज्या अर्थी मनोरमा आलेली आहे, त्या अर्थी तिला बेलाशक चोपून काढल्याशिवाय, तिचे ढंग जिरायचे नाहींत. यावेळीं घरीं चल, आणि घे हातांत एक सोटा, येत नाहीं वळणावर म्हणजे काय ?

दुर्गादासः–भूल आहे बरं तुला. तिला मारल्यावर वळण लागायचं तर एका बाजूलाच राहील, पण अशानं एकाद्याचा हात धरून सुद्धां घरांतून चालती व्हायची; आणि एवढयाच या पुढच्या बेअब्रूला मी भितों.

रत्नाकरः—अरे, पण आतां राहिली आहे कुठं अब्रू शिल्लक ? एर्वी तेर्वी साऱ्या या गांवभर दुर्गादासाच्या बायकोचा डंका चांगला अगर्दी सुरेल सुरांवर पिटला गेलेलाच आहे, म्हणून म्हणतों, होऊं दे एकदां सोक्षमोक्ष पुरा. तुझं तरी काय जातं त्यांत ? गेली अवदसा घरांतून निघून, तर गेली. तिच्या जागीं लेका दुसरी मिळेल, पण हिला आज ठोक.

दुर्गादासः—असं म्हणतोस ! बरं, बरं चल, तुझ्या मनाप्रमाणं होऊन जाऊं दे. चल.

रत्नाकरः—हं, अस्सं; असं जरा अवसान आणीत चल, अगर्दींच नेमळटासारखं करशील, तर दिवसा ढवळ्या हे लोक तुझ्या घराला लेका आग लावतील कीं. चल.　　　　( जातात. पडदा पडतो. )

---

## प्रवेश ४ था.

[ स्थळ—फत्तेगडच्या पुढील गच्चीवर जयसिंग बसलेला आहे. ]

जयसिंगः—

पद—( चाल—' प्रलयाची जी हतदशा ' )

आली देशा अवकळा ॥ जनता ढाळी, अश्रु घळघळा ॥ धृ० ॥
जनपद्राहू छळित बांधवा । राखि लाज अजि तूंचि माधवा ॥१॥

( स्वगत ) किती अविचारी आहें मी ! राक्षसस्वरूपी पित्याला परमेश्वर-स्वरूप मानून; या माझ्या अंधविश्वासाच्या पायीं, कित्येक सद्गुणी हृद-यांचा मी चुराडा केला, आणि अजूनहि चुराडा करायला कारणीभूत होत आहें. परमेश्वरा, यावेळीं माझा जीव जरी धोक्यांत असला तरी विश्वासानं बरोबर आणलेल्या रोहिणीचा जीव मात्र धोक्यांत आणूं नकोस. ज्या जागेंत मी रोहिणीला ठेवलेली आहे, ती जागा एकट्या दिवाणजीखेरीज कुणालाहि माहीत नाहीं; पण परमेश्वरा, परवांची बाबांची

ती राक्षसी प्रतिज्ञा डोळ्यापुढं उभी राहिली, म्हणजे दिल् कसा अगदीं फाटून जातो, दुर्दैवानं ती जागा जर बाबांना सांपडली, तर–तर काय ? अरेरे ! परमेश्वरा, परमेश्वरा, त्या क्षणीं या जयसिंगाची प्राणज्योत मालवून टाकायला विसरूं नकोस. दिवाणजी, तुमच्या आणि स्वामींच्या शब्दांवर जर पूर्वींच भरंवसा ठेवला असता, तर आज या सैतानी साम्राज्याचा पोकळ डोलारा या मनगटानं धुळीला मिळवून, स्वातंत्र्याच्या नंदनवनांत सारी जनता अगदीं आनंदानं खेळवली असती. असती आणि नसती ! ! पण काय झालं हें शेवटीं ! ( खालीं पाहून ) अरे, पण हे कोण दोन सरदार वरती येत आहेत ? [ दोन सरदार, पूर्वींच्या पहारेकऱ्यांना, हुकमाचा कागद दाखवितात. पहिले पहारेकरी जातात. एक सरदार खालीं पहाऱ्यावर राहतो, दुसरा वर जाऊन जयसिंगाला पत्र देतो. ]

जयसिंगः–कोण तूं ? आणि हें पत्र कुणाचं ?

सरदारः–पत्र दिवाणजींचं आहे सरकार. पत्र वाचल्यावर एका क्षणाचाहि विलंब न करितां बाहेर घोडा ठेवला आहे त्यावर स्वार व्हा.

जयसिंगः–( पत्र वाचून ) शाबास, दिवाणजी ! बस्, आतां पहिली गोष्ट म्हणजे या किल्ल्यांत कोंडून ठेवलेल्या आयाबहिणींची अगोदर मुक्तता करणं, आणि मग रोहिणीला एकदम विलासपुरला पाठवतों. चल, चल लौकर; मी घोड्यावरून स्वार होऊन पुढें निघून जातों, तूं मात्र किल्ल्यांतल्या साऱ्या कैद्यांना एकदम मोकळं करून सोडून दे. अहाहा ! दिवाणजी, शाबास ! ! ( जयसिंग निघून जातो. पडदा पडतो. )

---



शंकरराव:—कां ? या कीं आतां पुढं ? [ पृष्ठ ५९.

## प्रवेश ५ वा.

[ स्थळ:—दुर्गादासाचें घर. मनोरमा आरशांत पहात दागिने घालीत आहे. शंकरराव जवळच बसलेला आहे. ]

मनोरमा:—

पद—( चाल:—'भांग असा उलटाचि' )

मोद मना जाहला, प्रिया या जिवाला ॥ धृ० ॥ राहो नित्य हा असा । देव बाई पावला ॥ साहिना हो, जाच अति । भारी कसा तो जिवाला ॥ १ ॥ राज—तेज कुंठित मती । बनवी करी दंग चित्तीं । प्रणय बोल । हृदयीं खोल । बैसे सुखा दे जिवाला ॥ २ ॥

**शंकरराव:**—अस्सं ! परवाच्या भेटींत महाराजांकडून हा रत्नजडीत हार मिळाला म्हणायचा. ठीक आहे. असंच रुसून फुगून आणखी थोडें जडजवाहीर मिळवलंस, कीं आपला ठरलेला बेत अगदीं बिनबोभाट पार पडलाच म्हणून समज.

**मनोरमा:**—शंकरराव, तिकडच्या कानावर जर कां आपलं हें कांहीं गेलं, तर मात्र बाई—

**शंकरराव:**—मी म्हणतों अगदीं कळलं सारं त्या दुर्गादासाला, तरी काय होणार आहे त्याच्याकडून ? जरासे हात पाय आपटील आणि कपाळावर हात मारून त्या रत्नाकराकडं जाऊन स्वस्थ बसेल. महाराजापुढं त्याची जायची खास हिंमत नाहीं. संपलं ! आहे काय त्यांत घाबरण्यासारखं ?

**मनोरमा:**—खरंच शंकरराव, कांहीं कांहीं वेळां मेलं जिवाला कसं अगदीं वाईट वाटतं. हेच अगदीं जिवाला चांगलं सुख देणारे असते, तर ह्यांना चांगला संसार नसता का मी करून दाखविला ? लग्न झाल्या दिवसापासून कधीं मेला प्रेमाचा शब्द त्यांच्या मुखावाटे पडला असेल, तर शपथ अगदीं.

शंकरराव:–अग, त्या बावळटाला प्रेमाची काय कल्पना असणार ? त्याला तें मुळचंच अंगीं असावं लागतं. खरोखर मनोरमे, आपलं पुढलं आयुष्य आतां इतकं सुखांत जाणार आहे, कीं इंद्राची इंद्रायणी सुद्धां तुझा मत्सर करायला लागेल.

मनोरमा:–खरंच कां इतकं सौख्य मिळेल शंकरराव ? अहाहा !

पद–( चाल–' दरस दिखादे ' )

रुखरुख जीवाचि या, बोलें मावळे ॥ धृ० ॥ त्वरित स्वर्ग ये । महिवरी हा भासे आज । हा रंगनाथ रंग । खेळे गोपीसंगें आज । भासे दुनिया रंगेल ॥ १ ॥

शंकरराव:–मनोरमे, तुझे दुःखाचे दिवस आतां पार अस्तास गेले म्हणून समज. हा शंकरराव यापुढं आतां नुसता तुझ्या आशेचा धनी आहे. या नाजुक सुकुमार फुलाकडं वांकड्या नजरेनें आतां कुणाची पहायची छाती आहे ? या सुंदरमुखांतून नुसता शब्द बाहेर पडतो ना पडतो, तोंच हा तुझा शरीरसंरक्षक अगदीं वरच्यावर झेलील. अहाहा ! मनोरमे, यावेळीं हें तुझं मुखमंडळ, अगदीं पौर्णिमेच्या चंद्रालासुद्धां लाजवित आहे. आज जों जों तुझ्या मुखाकडं पहावं तों तों माझं मन कसं अगदीं गुंगून जातं. जगांतल्या साऱ्या सुंदर वस्तूंचं सौंदर्य आज एकाच ठिकाणीं एकवटलेलं दिसतं आहे.

मनोरमा:–अहो, पण हो, हो. आज अगदीं वर्णन करायचा मक्ताच घेतला आहे वाटतं ? कुणाला मेलं खरं सुद्धां वाटायचं नाहीं हो.

शंकरराव:–अहाहा ! बोलण्यांतसुद्धां किती मिठासपणा आहे ! बोल, बोल; कर वर्षाव माझ्यावर, तुझ्या त्या गोड शब्दांचा–अहाहा ! दुर्गादासासारख्या नरपशूला या असल्या रत्नाची काय पारख असणार ? वाहवा ! ब्रह्मानंद ! ब्रह्मानंद ! म्हणून जो कांहीं म्हणतात, त्याचा आज मी खरोखरच आस्वाद घेत आहें. परमेश्वरा–( दारावर थाप. ) अं–कोण ?

मनोरमा:—अगबाई, आले वाटतं घरीं ! ( जोरानं ) कोण आहे बाहेर ? ( बाहेरून:—"दार उघड अगोदर.") थांबा जरा उघडतें. (शंकररावास) आतां कसं बरं करायचं ?

शंकरराव:—अग, त्यांत काय आहे ? उघड दरवाजा. आजच जाऊं या अगदीं राजरोस. कांहीं भिऊं नकोस; जास्त त्यानं गडबड केली तर ही बघ नागीण तयार आहे. ( कट्यार दाखवतो. )

मनोरमा:—काय व्हायचं असेल तें होईल. अश्शी जाऊन उघडतें दरवाजा. [ दरवाजा जाऊन उघडते. दुर्गादास व रत्नाकर आंत येतात, तोंच शंकररावाला पाहून दोघेहि चकीत होतात. ]

दुर्गादास:—कोण शंकरराव ? माझ्या पश्चात् घरांत येऊन बसायला शरम नाहीं वाटत तुम्हांला ?

रत्नाकर:—हरामखोरा, असलं बेशरमपणाचं प्रदर्शन दाखवायला लाज नाहीं वाटत ?

शंकरराव:—( खूप हंसतो ) कां ? पण एवढं संतापायला काय झालं त्यांत ? मी नुसता घरांत येण्यानं तुम्हीं एवढें संतापलांत, तर आतां पुढचा प्रकार पाहिल्यावर, मला वाटतं एकदम स्मशानच गांठाल कीं.

दुर्गादास:—पाजी जनावरा, तुला उभा चिरून टाकतों. (त्याच्या अंगावर दोघे धांवतात, तो कट्यार रोखतो. दोघे मागें सरतात. )

शंकरराव:—कां ? या कीं आतां पुढं ? अजागळ मर्कटा, आज हा शंकरराव तुझ्या डोळ्यांदेखत तुझ्या या बायकोला कायमची नेत आहे, लक्षांत ठेव.

दुर्गादास:—अरेरे ! मनोरमे—

मनोरमा:—हं, बोला एकदां. काय करतें आहे मी वाईट ? असला सोन्यासारखा अलंकार सहजासहजीं हातीं येत असतांना, तुमच्यासारख्या चांदीच्या अलंकाराला कोणती स्त्री कवटाळीत बसेल ? शंकररावाचं अंतःकरण आणि माझं अंतःकरण आतां इतकं एक झालं आहे, कीं ते ब्रह्मदेवालाहि अलग करतां येणं शक्य नाहीं. तुमच्याबद्दल मला मुळींच प्रेम

वाटत नाहीं, त्याला मी काय करणार ? आणि तुमच्यावर मीच काय पण कुणीहि स्त्री प्रेम करणं शक्य नाहीं. स्त्रियांचं सुख कशांत आहे, हें जो पुरुष ओळखतो, त्यावरच स्त्रिया प्रेम करीत असतात हें लक्षांत ठेवा. तुमच्याशीं लग्न लागल्याबद्दल मला एकसारखा पश्चात्ताप होत आहे. सारं जग जरी या कृत्यांबद्दल मला आतां हंसलं, तरी त्या हंसण्याला असं पायां-खालीं तुडवून ही पहा मी चाललें.

पद—( चालः-' है दिलबर मुझको ' )

मनोरमाः—या जिवलग जिवासंगें; जाते, घ्या हो सलाम ।। धृ० ।।
शंकररावः—अंगीं न यांच्या त्राण; दिलवर अंगीं न यांच्या त्राण ।
मनोरमाः—हो छान; हो छान् !
शंकररावः—ही जान कुरबान् ! ।। १ ।।

(शंकररावाबरोबर निघून जाते. दुर्गादास व रत्नाकर एकमेकाकडं पहात स्तब्ध उभे राहतात. पडदा पडतो.)

---

## प्रवेश ६ वा.

[ स्थळ—बागेंतील एक बंगला--रोहिणी प्रवेश करते. ]

रोहिणीः—(स्वगत ) मला इथं ठेऊन जयसिंग महाराज जे फत्तेगडला गेले ते अजून कसे परत आले नाहींत ? दिवाणजी परवां भेटून जातांना म्हणाले, कीं फत्तेगडचं सारं काम फत्ते झालं म्हणून ! मग मला कसं अजून भेटायचं झालं नाहीं तें ! यशाचा वांटा असे एकटे एकटेच घेतां होय ? पण अशानं एक शब्दसुद्धां यापुढं बोलायची नाहीं. (तसबीरीकडे पाहून) पण या चित्राकडे पाहिलं ह्मणजे, सारा मेला राग कसा अगदीं जागच्या जागीं राहतो. अगदीं एकसारखं चित्राकडं पहात रहावंसं वाटतं ( दचकून ) अं ! असं काय तें !

पद–( चाल–'ना मारो पिचकारी' )

ना मारी शर जिवां या ॥ राया ॥ मृदुल जिव्हारीं लागे हो सदया ॥ धृ० ॥ दाटे प्रभा तव नयनीं रे राया ॥ दिपाविशी या तव जाया ॥ १ ॥ दीन जिवां–या, झुलवि न राया ॥ अर्पियला जीव जिवां या ॥ २ ॥

रोहिणीच्या देवा, या नाजुक जीवांकडून आणखी किती बरं विनवणी करून घ्यायची ? हा पहा, पहाटेचा गोड वायुसुद्धां, माझ्या कानांत कायसंसं गुणगुणून पळून गेला तो ! काय रे लबाडा, काय बोललास ? मी जयसिंग महाराजांची पट्टराणी—अगबाई, पण खरंच कां हें सारं ? हा पहा, क्षितिजाच्या पडद्याआड लपलेला चंद्रसुद्धां, हळूंच तोंड काढून कसा मला एकसारखा चिडवीत आहे तो ! पण मी नाहीं चिडणार––अगबाई, पण नाहींसा सुद्धां झाला एकदम—आणि या तेजोमय तारकासुद्धां विरहानं कशा अगदीं तेजोहीन झाल्या. देवा, प्रणयी जीवाच्या गोड स्वप्नांचा असा विरस ( मानसिंग मागें येऊन उभा राहतो. )

मानसिंगः–रोहिणी––

रोहिणीः–( पाहून स्वगत ) अगबाई, पण हा कोण ? माझ्या प्रेमी स्वप्नाचा अस्त आणि या पुरुषाचा उदय झालेला पाहून, काळीज असं चर्र कां बरं झालं ?

मानसिंगः––रोहिणी, अशी गोंधळलीस कां ?

रोहिणीः–कोण आपण ? आणि इथं कां बरं आलांत ?

मानसिंगः–(हंसून) रोहिणी, परमेश्वराच्या वास्तव्याला जागेची मर्यादा नसते.

रोहिणीः–( आश्चर्यानें ) परमेश्वर ? म्हणजे ! मला नाहीं कळला तुमचा अर्थ.

मानसिंगः–रोहिणी, ज्या शहरांत तुझं सांप्रत वास्तव्य आहे त्या शहरचा परमेश्वर हा मानसिंग, तुझ्या सारख्या सरळ हृदयाच्या प्रेमी भक्तांना भेटण्याकरितां आला आहे.

रोहिणीः–( स्वगत ) अस्सं ! रोहिणीच्या फुटक्या नशीबा, शेवटीं अशा रीतीनं उचल खाल्लीस अं ? पण दैवानं जरी उचल खाल्ली, तरी रोहिणीनं मात्र अशा आणिबाणीच्या प्रसगीं आपली अक्कल मुळींच गमावतां कामा नये. आतां या असल्या प्रसंगीं दोन गोड शब्द बोलूनच या सैतानाचा समारोप मला केला पाहिजे.

मानसिंगः–भक्ताच्या याचनेची अपेक्षा करणारा परमेश्वर, आज भक्ताच्या एका शब्दालाहि महाग आहे का ?

रोहिणीः–( स्वगत ) दोन गोड शब्द बोलून, याला येथून घालविलाच पाहिजे. ( उघड ) परमेश्वराचा लाभ भक्तांना जर अनपेक्षित झाला, आणि त्याच्या उज्वलकांतीच्या लकाकीनं, भक्त जर कांहीं काल दिपून स्तब्ध झाला, तर हा दोष भक्ताचाच म्हणतां येईल का ?

मानसिंगः–( स्वगत ) काय चमत्कार आहे हा ? आजपर्यंत प्रत्येक स्त्रीची अनुदारवृत्तीच माझ्या अनुभवाला आली असतां अपवादाचा मोठे-पणा आज रोहिणीसारख्या स्त्रीला मिळतो आहे, म्हणजे आश्चर्याची कमाल नाहीं का ? असलं सरळ आणि नाजुक हृदय अगदीं स्वखुशीनं जवळ येत असतां, नसत्या कल्पनांचं रण मी विनाकारणच डोक्यांत माजवलं म्हणायचं ! किती गोड आणि नाजुक बांधा आहे हा ! मानसिंगा––
( एक सरदार घाईघाईनें प्रवेश करतो. )

सरदारः–घात झाला सरकार, चला, चला लौकर. धाकट्या सरकारांनीं फत्तेगडवरील साऱ्या कैद्यांची मुक्तता केली, आणि स्वतः कुठं नापत्ता झालेले आहेत.

मानसिंगः–( संतापून ) काय करूं ? गडावरचे सारेच पहारेकरी असे कसे गाफील राहिले ? चल, हो पुढं, मी आलोंच. ( सरदार जातो. ) पाहिलंस रोहिणी, आमच्यासारख्या राजकर्त्यांना, प्रेमाचा विषय बोलायला, कशी एका घटकेची सुद्धां फुरसत नसते. काय करूं ? रोहिणी, यावेळीं

मला किती तरी तुझ्याजवळ बोलायचं होतं, पण ऐनवेळीं या कारस्थान डाव साधून, मोठ्या आणीबाणीची वेळ आणून ठेवली आहे. ठीक आहे. रोहिणी तूर्त जातों मी; संध्याकाळीं निवांतपणानं तुझी परत गांठ घेईन. ( निघून जातो. )

रोहिणीः–काय नंदी बैल मनांत मांडे खातो आहे पण–( दोन सरदारांसह जयसिंग बुरखा घेऊन प्रवेश करतो. ) हें कोण ? अगबाई, आज आहे तरी काय हें ?

जयसिंगः–( एकदम बुरखा काढून ) रोहिणी, रोहिणी—

रोहिणीः–अगबाई, कोण महाराज ! ( दोघें भेटतात )

जयसिंगः–रोहिणी, आतां एका क्षणाचाहि विलंब न लावतां, या दोन सरदारांबरोबर ताबडतोब तुझ्या घरीं विलासपुरला निघून जा. हा सारा प्रकार तुला मागाहून आपोआप कळेल. चल, चल, जा अगोदर.

रोहिणीः–पण आपल्या जिवाची—

जयसिंगः–अगदीं सुद्धां काळजी करूं नकोस. परमेश्वर आपले मनोरथ पूर्ण केल्यावांचून राहणार नाहीं. पण जा, जा लौकर आतां. ( दोन सरदारांबरोबर रोहिणी जाते ) अहाहा ! परमेश्वरा, एका कामगिरींतून पार पाडलंस खरं, तसंच दुसऱ्या कामगिरींतून पार पाडायला तुझा नुसता आशिर्वाद दे, म्हणजे हा जयसिंग कळीकाळालासुद्धां भीक घालणार नाहीं.

( मानसिंग सरदारांसह प्रवेश करतो. )

सरदारः–हा पहा पुरावा आमच्या म्हणण्याचा.

मानसिंगः–बस्, एकदम गिरफदार करा. ( गिरफदार करतात. ) जयसिंगा, तुझ्या छातीवर थय थय नाचायला मी जिवंत असतांना, तूं आपली इच्छा कशी पूर्ण करणार ? ( पाहून ) इथं असलेली रोहिणी कुठं आहे ! हरामखोरानं नापत्ता केली वाटतं ? जयसिंगा—

जयसिंगः–काय म्हणतां ?

मानसिंग:–रोहिणी कुठं आहे ?

जयसिंग:–( हंसून ) रोहिणी ? गेली बापाकडं !

मानसिंग:–( स्वगत ) अरेरे ! ( उघड ) जयसिंगा, कोणत्या आधारांवर तूं या साऱ्या गोष्टी करीत आहेस ?

जयसिंग:–प्रत्येक प्राणीमात्रांना आधार देणारा जगदीश्वर.

मानसिंग:–जगदीश्वर ! हट्टी मूर्खा, मानसिंगाच्या क्रोधाग्नीची एकच ठिणगी, त्या जगदीश्वराला उभा जाळून खाक करील. जयसिंगा, अजून तुझ्या हूडपणाबद्दल क्षमा करायला मी तयार आहें; असल्या नादानपणाला बळी पडून स्वतःच्या जीविताची राखरांगोळी करून घेऊं नकोस. पिता या नात्यानं अजून मी दयेचं दान सहज करीन, पण पूर्वीप्रमाणं वागण्याची शपथ—

जयसिंग:–बाबा, माझ्याबरोबर झुंझायची तुमच्या अंगांत ताकद आहे ना ? मग या क्षणाला तुमचे हे सहानुभूतीचे शब्द पार गुंडाळून ठेवा. गोडशब्दांच्या भडीमारानं विरघळणारा हा जयसिंग नसून, तुमचं पाप आतां तुमच्या पदरांत निर्भीडपणानं घालणारा, दीन दुनियेचा एक बंदा नौकर आहे. सावध व्हा. बाबा अजून तरी सावध व्हा. आणि केंविलवाण्या नजरेनं पहात असलेल्या रयतेकडं एकदां तरी नजर फेंका, आणि रयतेचा पालनकर्ता या पवित्र नांवाचं सार्थक तरी करा.

मानसिंग:–तुमच्या सारख्या हरामखोर लोकांच्या अंतःकरणांतले, हे देशभक्तीचे उमाळे, माझ्या पूर्ण परिचयाचे आहेत हें लक्षांत ठेव. या विजयनगरांतल्या साऱ्या बदमाषांना, जेव्हां असं ठोकरीनं उडवीन, त्याच वेळीं हे बावचळलेले बदमाष बेरड, बरोबर ताळ्यावर येतील.

जयसिंग:–बदमाष बेरडांना तुम्ही जरी लाथेनं तुडविलंत, तरी त्यांत तुमची स्वतःची बदमाषी झांकली जाईल कां ? बाबा, कृष्णकारस्थानाच्या काळ्याकुट्ट ढगांवर न्यायीपणाचा मुलामा देण्याकरितां, नंग्या तलवारींचा



रोहिणीः—अं ! असं काय तें ? [ पृष्ठ ६०

मायावी पहारा, जरी अगदीं खडा ठेवलांत, तरी पण उज्वल स्वातंत्र्याच्या तेजस्वी विद्युल्लतेचा चमकारा, तलवारींचं तें मायावी कवच फोडून, त्या ढंगांना अश्रू ढाळायला लावल्यावांचून राहणार नाहीं. बाबा, विजयनगरावर, अरेरावी सत्ता गाजविण्याचे दिवस, आतां पार अस्तास गेले आहेत हें लक्षांत ठेवा. विजयनगरांतल्या प्रत्येक व्यक्तीचं शरीर जरी तुम्हीं आतां घडापासून वेगळं केलंत, तरी खूण गांठ बांधून ठेवा, कीं तीं निर्जीव धडं सुद्धां, ऐनवेळीं उसळत्या जोमानं सैतानी सत्ताधीशांच्या सरसकट सत्तेला पार उधळून लावल्यावांचून राहणार नाहींत.

मानसिंगः—अस्सं; हेंच उत्तर जर उद्यांहि ऐकायला मिळेल, तर कट्यारीची एकच फेंक काळजाचा ठाव घेईल.

जयसिंगः—काळजाचा ठाव घेईल, पण नांव अजरामर करील.

—ड्रॉप—

**अंक ३ रा समाप्त.**

# अंक ४ था.

## प्रवेश १ ला.

[ स्थळ:—विलासपूर—दीपसिंगाचा दिवाणखाना—रोहिणी प्र. क. ]

रोहिणी:—(स्वगत) फिरत्या भोंवऱ्याप्रमाणं नशीबाच्या या चकरा, देवा रोहिणीनं आतां किती रे सोसायच्या ! पाठविलेल्या हेरानं बातमी आणली कीं महाराजांना परत कैद झाली म्हणून; कांहीं तरी कारस्थान करायला, पुरुष वेषानं मी तिकडं जातें, म्हणून कालपासून सारखी बाबांच्या पाठीस लागलें आहे, पण या बाबतींत एक शब्दसुद्धां माझा ते ऐकत नाहींत. काय करूं बरं मी ! परमेश्वरा—

पद—( चाल—' दया छाया घे ' )

दिशा दावा या अभागिनीला । तम नयनीं या दाटला ॥ धृ० ॥
दावि मार्ग निराधार । जिवा या । पंकीं कसा अजि रुतला ॥ १ ॥

छेः छेः, काय करूं, कसं करूं, हें रडगाणं गाण्याची ही वेळ नसून रोहिणीच्या उज्वल कर्तव्याची, ही शेवटची कसोटीची वेळ आहे. तें कांहीं नाहीं, बाबा परवानगी देईपर्यंत मी आतां मुळीं त्यांच्याशीं बोलायचीच नाहीं; पण ते पहा, आलेच बाबा. ( दीपसिंग प्रवेश करतो. रोहिणी रागानें तोंड फिरवून बसते. )

दीपसिंग:—(स्वगत) ही रागावली वाटतं? काय पोरीची जात हट्टी आहे! (उघड) बाळ, किती अविचारी आहेस तूं? क्रूर वाघाच्या तडाक्यांतून सुटलेल्या हरिणीनं, सूडाच्या त्वेषानं जर त्याच्या गुहेकडं परत धांव ठोकली तर ती रोहिणी, विचाराची होईल कां? अशानं उद्याचं संकट, आजच कां अंगावर ओढून घेण्याचा प्रयत्न करतेस? तिथं तूं गेल्यावर, जर कां एकाद्यानं तुझा संशय घेतला, तर कोणत्या परिस्थितींत जाऊन पडशील,

याचा थोडा तरी विचार आहे कां तुला ! त्यापेक्षां मी स्वतः लढाईला तोंड दिलं तर—

रोहिणी:—असलं साहस करून लढाईला तोंड देणं, म्हणजे स्वतःच तोंडघशी पडण्यासारखं नाहीं का ? बाबा, मानसिंगाची बाजू लेचीपेची आहे, असं का तुम्हाला वाटतं ? लोकपक्ष त्यांच्याविरुद्ध जरी आतां असला, तरी पण हत्यारबंद दरबारी मंडळापुढं कुणाचं कांहीं एक चालायचं नाहीं. जयसिंगमहाराज जर कैदेंत नसते, तर लढाईची ही मसलत यशस्वी होण्याचा संभव होता, पण आज परिस्थिती इतकी बिकट आहे, कीं युक्ती-युक्तीनंच दगडाखालचा आपला हात, आपल्याला हळूंच सोडवून घेतला पाहिजे. बाबा, एका क्षणांत ही रोहिणी मानसिंगाला आपल्या जाळ्यांत अडकविल्यावांचून राहणार नाहीं.

दीपसिंग:—पण असं कोणतं एवढं कारस्थान करून, त्या प्रबल शत्रूला तूं जेरीस आणणार आहेस ? नसता पोरकटपणा करून स्वतःचे प्राण धोक्यांत आणशील, आणि मागाहून मला पश्चात्ताप करायला लागेल. कारस्थान, कारस्थान असं नुसतं म्हणून कां त्याबद्दल मोठेपणा व्यक्त होणार आहे ? मला नीट सांग अगोदर काय तें ?

रोहिणी:—अमुक एक कारस्थान तिथं जाऊन मी करणार आहें, या-बद्दल अद्याप कांहींच निश्चित नाहीं. पण एवढं मात्र लक्षांत ठेवा, कीं रोहिणी जें बडबडते आहे, तें स्वतःची कर्तबगारी ओळखूनच बडबडते आहे. दांडगा आत्मविश्वास कार्याचा शेवट गांठल्यावांचून राहणार नाहीं.

दीपसिंग:—( स्वगत. ) काय करावं आतां या पोरीला ?

रोहिणी:—देता ना बाबा, संमति ? सांगा ना जायला लौकर ?

दीपसिंग:—पण रोहिणी—

पद–( चाल–' मद्यमद चोरी तप ' )

वृद्ध जीवासि कां, देसि यमयातना ॥ धृ० ॥ मृत्यू अजि विक-
राल । ये न कां कल्पना ॥ १ ॥ तूं एक कन्यका । जाई जरि
अरिगृहा । जाळी ही कल्पना । आधार तुज विना? ॥ २ ॥

रोहिणीः–आतां पण नको, ना रोहिणी नको, दोन सरदार बरोबर देऊन अगोदर रवानगी करा.

दीपसिंगः–जा रोहिणी, मी तरी तुझा हिरेमोड कशाला करूं ? पण स्वतःच्या जिवाची—

रोहिणीः–अगदींसुद्धां काळजी करूं नका. माझा जीव सुरक्षित राखून हें कारस्थान यशस्वी करून दाखवीन, तरच नांवाची रोहिणी. बाबा, आपला नुसता आशिर्वाद माझा पाठीराखा आहे.—

पद–( चाल–' मम सुखाची ' ताल–रुपक. )

कर सुता या; देई आतां; धरी ना हो शंका ॥ धृ० ॥ मी हतबल
न बाला । मम बोल हे; विफल ना हो ॥ सकलहि मर्मचि मज ।
ज्ञात होई आजि; शाश्वत । तव कर बलें कसा तोटा ? ॥ १ ॥

[ सर्व जातात. पडदा पडतो. ]

---

## प्रवेश २ रा.

[ स्थळ–स्मशानाकडील एक रस्ता. खांसाहेब दुःखी मुद्रेनें प्रवेश करतो ]

खांसाहेबः–अफसोस ! अफसोस ! इस दुनियामें क्या अंधेरा है ! शंकररावको, मनोरमाको देनेके लिये, जो कुछ मेरेपास था, वह सारा डागडागिना दे दिया; लेकिन बदमाषनें मालभी पचाया, और मनोरमाको लेकर किदर भागभी गया. किसीनें सच कहा है, के " इस मक्कार दुनियामें, कोईभी, किसीका एतबार न करें ". वह काफीर कहां फरार

हुवा, कुछ पताभी नहिं लगता; सब शहर धुंडमारा, शहरके कोतवाल-कोभी सब बोलदिया, के कुछ तलाश लगे, लेकिन अभीतक कुछ पता नहि. इस राजमेंभी, इतना अंधेरा है, के पुछोमत. हमारे मानसिंग महाराज तो आपनीहि मस्तीमें मस्त हैं ! अब क्या करें ! किससे कहे ! ! ( पाहून ) अरे, यह कौन सामनेसे आ रहा है ? इसका सब पेहराव तो हिंदूका मालुम हो रहा है, लेकिन इतनी दाढी क्यों बढा रख्खी ! और आगे पिछे, देखते आरहा है ! ऐसे छुपते आना, ये कोई भले आदमीका काम नहिं है. चोर तो नहि होगा ! कोई भी हो, लेकिन् जरा छुपकर देखना चाहीहै. ( एका बाजूला दडून उभा राहतो; वेषांतर केलेला शंकरराव प्रवेश करतो. )

**शंकरराव**:–( हातांतल्या दागिन्यांच्या गांठोड्याकडं पहात ) नुसत्या बुद्धिच्या जोरावर इकडची दुनिया इकडे फिरवतां येते, याची साक्ष मला आज पटली. वा रे कर्तबगारी ! वेडे मनोरमे, फुलांतला मकरंद चाख-ल्यानंतर भ्रमर त्या फुलांकडं नुसता ढुंकूनहि पहात नसतो, हें तत्त्व तूं विसरलीस, आणि म्हणूनच माझ्या जन्माचं कल्याण झालं. जा, आतां वाट फुटेल तिकडं चालती हो. मला मुळींच त्याची पर्वा नाहीं. तो खांसी-हेब तसाच नंदीबैल ! वेड्यानं मनोरमा मिळावी, म्हणून मागितले तितके दागिने अगदीं निमूटपणानं काढून दिले. ( हंसून ) हं–काय मूर्खपणा भरला आहे दुनियेंत ! जरा डोकं वापरलं कीं या चालचलाऊ दुनियेंत, राजरोस वावरणाऱ्या मूर्खपणाचा फायदा, मनुष्याला सहजासहजीं घेतां येऊन, आपल्या जन्माचं कल्याण अगदीं सहज करून घेतां येतें. चला हा सारा ऐवज घेऊन, येथून अगदीं लौकर फरारी झालं पाहिजे. ( तो जाणार, तोंच खांसाहेब त्याच्यावर झडप घालून त्याला खालीं पाडतो. )

**शंकरराव**:–को–कोण ?

**खांसाहेब**:–तेरा बाप. ( त्याच्या छातीवर बसतो. ) बदमाष, खांसा-हेबको फसाना, कुछ मामुली बात नहीं है.

शंकरराव:-अहो, अहो-पण ग-ळा नका-हो दाबूं; अहो-पण गळा-नुसते बसा छातीवर पाहिजे तर—

खांसाहेब:-चूप बेवकूफ. अभी हरगीज नही छोडूंगा. मुझको फसानेवालेको, क्या मजा नसीब होता है, वह तेरेको दिखा देता हूं. ( गळा दाबून प्राण घेतो. ) बेटा, करो अब आराम. ( दागिने घेऊन खांसाहेब जाऊं लागतो, तोंच कोतवाल शिपायांसह प्रवेश करतो. )

कोतवाल:-एकदम ठैरो वहां. कौन खांसाब ? ओ हो ! ये खून कैसा हुवा ?

खांसाहेब:-येहि काफीर मेरा माल चुराके भाग गया था.

कोतवाल:-खांसाब, तुम भी काफीर है. चलो, डालो बिडीयां इसके हातमें. लाव वह सब माल इदर. जाव, अब कैदखानेमें.

खांसाहेब:-डर किसीको बता रहा है ? महाराजका मैं गवई हूं; ध्यानमें रखना.

कोतवाल:-बस्, चूप बैठ अब. मैं सब लोगोनको अच्छी तऱ्हेसे जानता हूं. जाव; इसको लेके जाव. ( कांहीं शिपाई शंकररावाचें प्रेत फरफर ओढीत नेतात, व कांहीं खांसाहेबाला कैद करून घेऊन जातात.)

कोतवाल:-या दागिन्यांतले कांहीं दागिने पचवायला कांहींच हरकत नाहीं. असे खून दररोज होतील, तर एकाद्या गांवचा जहागिरदार सहज होईन. ( जातो. मनोरमा दुःखी मुद्रेनें प्रवेश करते. )

मनोरमा:--काय झालं हें !

पद-( चाल-' लवकरी धांवरे ' )

मजवरी कोपलां; कां कमलावरा । जरि मी पतिताबला ।। धृ० ।।

पूनित ना हो काया । गेली ही वाया । पडतें मी देव, पायां ।। १ ।।

झालं तें कळतं आहे खरं, पण कसं झालं, हें मात्र देवा, नाहींरे कळत ! पापी मनोरमे, भोग आतां आपल्या कर्मांचीं फळं ! जगांतल्या नटव्या

सुखाची क्षणभंगुरता, नीच मनोरमे, तुला त्याचवेळीं जर समजली असती, तर आज सुखानं संसार साजरा नसता का केलास ! पतीच्या दुःखी हृदयांतून पिळवटून निघालेल्या शब्दांना, त्या दिवशीं, बेकामपणाच्या कैफांत तूं झिटकारलंस, पण आज तुझी काय स्थिती झाली आहे ! नीच शंकररावा, काय केलंस हें शेवटीं ! पण त्या नीच मांगाला मी कोणत्या तोंडानं दोष देऊं ? सौख्याच्या हव्यासानं घरांतून बाहेर पडले, पण आतां जन्माची अब्रूला पारखी झालें. परमेश्वरा, पापाची ही हिडीस पुतळी निर्माण करून तुला काय मिळालं रे ? मी आतां कुणाच्या तोंडाकडं बघूं ? घरीं परत जाऊन त्यांच्याजवळ कोणत्या तोंडानं क्षमा मागूं ? क्षमा—नीच मनोरमे, अजूनहि क्षमेची अपेक्षा करतेस ? नाहीं, देवा, आतां त्यांच्या पायाशीं मरण हेंच या पापी जीवाचं शेवटचं कर्तव्य ! ! (जाते. पडदा पडतो.)

---

## प्रवेश ३ रा.

[ स्थळः--विजयनगर. मानसिंगाचा दिवाणखाना. ]

मानसिंगः—(प्रवेश करतो) ईर्षेला पेटलेल्या दोन हट्टी जीवांच्या चढाओढींत, शेवटीं हार खाण्याचा प्रसंग या मानी जीवाला—अरेरे ! हार आणि मानी मानसिंग, या दोन शब्दांचं एकीकरण नुसतं कल्पनेलासुद्धां सहन होत नाहीं. पण नाहीं, असं निराश होणं या मानी स्वभावाला शोभायचं नाहीं. दीपसिंगा, माझ्या पराक्रमांवर उडवलेला हा अपमानाचा डाग, तुझ्या रक्ताच्या चिळकांड्यांनींच धुवून काढल्याशिवाय मी राहणार नाहीं. तसाच तो जयसिंग; आजपर्यंत हरामखोरानं माझा प्रत्येक शब्द अगदीं तळहातावर झेलला, पण आतां तोच अरेरावी कारटा प्रत्येक शब्द पायाखालीं तुडवतो आहे. ठीक आहे. सारी दुनिया जरी काळसर्पाप्रमाणं विषारी फूत्कार टाकीत माझ्यावर धांवून आली, तरी पण हट्टास पेटलेला हा मानसिंग, आपल्या सूडाची आग, रोहिणी दीपसिंगाच्याच अश्रूंनीं

विझवल्यावांचून राहणार नाहीं. रोहिणीसारखं गुलाबाचं फुल हस्तगत करून घेतांना, दुनियेंतल्या साऱ्या विषारी कांट्यांनीं, माझ्या अंगाचं रक्त काढण्याचा जरी प्रयत्न केला, तरी पण त्या गुलाबी गालांचं गोड चुंबन, एकदां तरी घेतल्यावांचून मी राहणार नाहीं. अहाहा ! त्या गुलाबी गालांची आठवण होतांच, स्वर्गीय आनंदाची उणीव भरून काढणाऱ्या गुलाबी शराबीची आठवण यावेळीं मला झाली. या गुलाबी शराबचा एकच घुटका, या त्रासदायक वातावरणांतून, माझी तात्पुरती तरी सुटका खास करील. ( दारूचा ग्लास तोंडाला लावतो. ) बस् अब मस्त है. ( कोचावर स्वस्थ पडतो. पुरुषवेषांत रोहिणी प्रवेश करते. )

**रोहिणीः**-(स्वगत) विलासपूरची ही रोहिणी, इथं येऊन आतां सेनापति शशांक बनली. परवां जंगलांत या स्वारीला शिकारींत वांचविलं, आणि त्याचा मोबदला या रोहिणीनं सेनापति होण्यांत घेतला. माझ्या प्रत्येक शब्दांवर या स्वारीचा आतां पूर्ण भरंवसा बसलेला आहे. ( नीट पाहून ) वा ! आज स्वारी बरीच रंगलेली दिसते आहे. ठीक आहे. मदिरेची धुंदी जोंपर्यंत डोळ्यांवर आहे, तोंपर्यंतच मनांत योजलेला डाव खेळून घ्यावा. ( जवळ जाऊन मुजरा करते. )

**मानसिंगः**-कोण ? शशांक, काय खबरबात ?

**रोहिणीः**-फार विचार करण्यासारखीच खबर आहे सरकार.

**मानसिंगः**-शशांक, विचार कर करून हें मस्तक आतां इतकं सुन्न झालं आहे कीं—

**रोहिणीः**-अगदीं सहाजिक आहे सरकार. आपल्या नांवानं रात्रंदिवस खडे फोडणाऱ्या टवाळ मंडळींची वावटळ, एकदां पुरी जमीनदोस्त केल्याशिवाय, आपल्या जीवाला मुळींच विसावा मिळणार नाहीं. सरकार, त्या दीपसिंगाला—

**मानसिंगः**-( खवळून ) दीपसिंग—शशांक, त्या दीपसिंगाचा नामोच्चार होतां क्षणींच, तळव्याची आग मस्तकाला जाते. हरामखोर—

रोहिणी:—मग त्या हरामखोराची पुरी विल्हेवाट कां लावित नाहीं सरकार ? कोणत्या मार्गानं या दुनियेंतून त्याला सहज हद्दपार करतां येईल, हें सांगण्याकरितांच हा आपला बंदा सेनापति शशांक, आज आपल्या चरणांजवळ आलेला आहे. ( स्वगत ) नीच मानासिंगा, माझ्या पुढल्या म्हणण्याला नुसता रुकार दे, कीं त्या क्षणींच तुझ्या जीवाची उलटी अंबारी ही रोहिणी केल्यावांचून राहणार नाहीं.

मानसिंग:—कोणता मार्ग तुम्हीं मला सुचाविणार आहांत शशांक ?

रोहिणी:—द्वंद्वयुद्धाचा मार्ग मी आपल्याला सुचवित आहे.

मानसिंग:—काय द्वंद्व युद्ध ?

रोहिणी:—होय सरकार, द्वंद्व युद्ध. सैन्याच्या जोरावर युद्ध फुकारायचे दिवस, आतां राहिलेले नाहींत, हें सरकारनं नीट लक्षांत आणावं. पूर्वीच्या आपल्या फत्तेसिंग सेनापतीनं, व धाकट्या सरकारनं, माफ करा सरकार, अगदीं नाइलाजानं मी धाकट्या सरकारचं नांव आपल्या समोर उच्चारीत आहें; पण या दोघांनीं, सैन्यांत इतकी फितुरी करून ठेवली आहे, कीं लढाईला जर आतां आपण तोंड दिलं, तर सरकार ऐनवेळीं आपलेच लोक आपल्यावर खात्रीनं उलटतील असा माझा अंदाज आहे. सेनापतीचे अधिकार आपण ज्या वेळीं मला दिलेत, त्याच-वेळीं आजुबाजूची सारी परिस्थिती मी चांगल्या तऱ्हेनं अवलोकन केलेली आहे. दीपसिंगाशीं द्वंद्वयुद्ध खेळूनच त्याचा कांटा नाहींसा केला पाहिजे.

मानसिंग:—( स्वगत ) काय करूं ? या कारट्यानं ही फंदफितुरी केली नसती, तर सैन्याच्या जोरावर आज आयता विजय संपादून, रोहिणी-बरोबर अगदीं मनमुराद विलास भोगीत राहिलों असतों. मी जर द्वंद्व युद्ध खेळलों आणि यदाकदाचित् मारला गेलों तर—अरेरे ! पुढली कल्पनासुद्धां सहन करवत नाहीं.

रोहिणी:—सरकार एवढे विचारांत कां पडलांत ? माझी सूचना आपल्याला आवडली नाहीं वाटतं ?

मानसिंगः—शशांक, सूचना मला मान्य आहे, पण—

रोहिणीः—पण काय सरकार ? जयाबद्दल आपल्याला शंका येते का ? ज्या समशेरीवर आजपर्यंत यशाचं पाणी चमकत आलं, ती समशेर, याच वेळीं अपयशाचा डाग मस्तकीं धारण करील, ही गोष्ट शक्य तरी वाटते का ? आणि द्वंद्वयुद्धाच्या वेळीं, जर तशीच कांहीं चमत्कारिक वेळ आली, तर सरकार आपल्या जिवाच्या जोखमीचा हा जागता पहारेकरी, आपल्या स्वतःच्या रक्तानं तो डाग धुवून काढल्याशिवाय राहणार नाहीं. सरकार, रणांगणांवर दीपसिंग द्वंद्व युद्धाला एकटा आला कीं,— ( कानांत सांगते )

मानसिंगः—बस् समजलों सारं. इट्टास पेटलेला मानसिंग आतां माघार घेणं शक्य नाहीं. जा, लिहून पाठवा खलिता त्या हरामखोराला.

रोहिणीः—या क्षणीं खलिता लिहून तयार आहे, फक्त सही करण्याची तसदी महाराजांनीं घ्यावी. ( खलिता पुढें ठेवते. )

मानसिंगः—शाबास शशांक ! तुमच्या तत्परतेबद्दल मला अभिमान वाटतो. ( सही करतो. )

रोहिणीः—सरकारची कृपादृष्टी असल्यावर काय कमी आहे मला ? ( स्वगत ) शाबास रोहिणी, एक काम फत्ते केलंस. ( पडदा पडतो )

---

## प्रवेश ४ था.

[ स्थळः—बागेच्या रस्त्यावर. रोहिणी गात गात प्र. क. ]

पद—( चाल—बलखाती तोरी )

फसला हा बाई; अचुक जालिं या, भारी अरि इरसाल ॥ धृ०॥
मज न दिसे; भय न दुनिया । जय चटकन आतां लाभे ॥
केंवि दिसत सूरत ? ॥ १ ॥ रोकडें विस्तरो सूख तें । ऐशिहि
संधी ये जिगर ॥ २ ॥ ( जाते. )

## प्रवेश ५ वा.

[ स्थळ—दुर्गादासाचें घर—दुर्गादास सचिंत बसलेला आहे. ]

दुर्गादासः—परमेश्वरा, हें काळं तोंड मी आतां कुणाला दाखऊं? आजपर्यंत या दुर्गादासानं कधीं कुणाची चोरी केली नाहीं, कुणाला नाहक बुडवलं नाहीं, आणि अशा पापभीरु माणसाला, देवा आज तूं कोणत्या स्थितींत टाकलंस! झालेला प्रकार पहाण्यापूर्वींच, या नटव्या दुनियेंतून मला कायमचा उचलून नेला असतास, तर जन्माचं थोडं तरी सार्थक झालं असतं रे! पण—पण काय? एवढं भाग्य या अभागी जीवाला कुठलं लाभायला! ज्या प्रकारानं माझ्या कुळाची मातीमाती झाली, तो किळसवाणा प्रकार, दुर्गादासा, तुला उघड्या डोळ्यांनीं पाहवला तरी कसा रे! काय उलट्या काळजाची माणसं दुनियेंत वावरत आहेत! अरेरे! दुष्ट मनोरमे, अखेरीस काय केलंस हें! एका सुशील घराण्यांतल्या स्त्रीनं केवळ विषयवासनेला आणि छानछुकीला बळी पडून, दुनियेंतल्या क्षणभंगुर सुखाचा आस्वाद घेण्याकरितां, एका तिऱ्हाईत माणसाचा हात धरून, बेशरम बाजारबसवीसारखं पळून जावं! आणि हा प्रकार या डोळ्यांनीं पहावा! परमेश्वरा, डोळ्यांच्या खाचा कां नाहीं करून टाकल्यास! छेः छेः छे; सारं कुल कलंकित झाल्यावर, एकाद्या स्वार्थी आणि निर्लज्ज माणसासारखं, या जगांत परत जिवंत राहणं, म्हणजे तर नीचपणाची कमाल करण्यासारखं आहे. बस्, झालं! आटोपला संसार, या दुर्गादासाचा! रत्नाकराला हें पत्र लिहून ठेवलेलंच आहे; आतां साऱ्या यातना बंद करणारं हें अमृत-- ( विषाची बाटली बाहेर काढतो ) बस् हें एवढं घेतलं, कीं मग सुटलों या विषारी विश्वांतून! घे, दुष्ट अवदसे, जगांतल्या नटव्या सुखाचा मनमुराद आस्वाद घे; अजून दुर्गादास या जगांत जिवंत असेल, या धास्तीनें, तुझं पापी अंतःकरण, एकादेवेळीं तरी हबकत असेल, पण तें सुद्धां या पुढं आतां मुळींच हबकण्याचं कारण नाहीं. नवऱ्याच्या रक्ताचा घोट घेणाऱ्या अवदसे; तुझ्या नांवानं या जहरी विषाचा घोट घेऊन, या नटव्या

दुनियेला या दुर्गादासाचा आतां शेवटचा राम राम. ( विष घेतो. मनोरमा धांवत येऊन एकदम पाय धरते. )

**मनोरमाः**—थांबा महाराज थांबा; पण--हायरे दैवा ! काय केलंस हें !

**दुर्गादासः**--को--ण ? म--नोरमा--चल दूर--हो चांडाळणी.

**मनोरमाः**—( तेंच विष पिते ) बोला, रागानं बोला, पण क्षणभर तरी या अभागिनीशीं बोला हो—

**दुर्गादासः**—काय बोलूं आतां ! माझ्या काळजाचा लचका तोडलास आणि आतां शांतवन करायला येतेस ! दुष्ट अवदसे, माझ्या आत्म्याचा तळतळाट, तुझ्या आत्म्याला अखंड बाधल्याशिवाय राहणार नाहीं—जा—चां—डा—ळ—णी—रा—म—( मरतो. )

**मनोरमाः**—गेला, माझ्या जिवाचा चंद्र गेला, आणि कठोर काळानं या कुंकवाला कायमचा अर्धचंद्र दिला. ( कुंकु पुसते. ) आयाबहिणींनो, या विधवेच्या दग्ध अंतःकरणांतले कळकळीचे शब्द नीट ऐका--पतीच्या पुण्य चरणाची पुण्याई, पापानंतर पुन्हां लाभायला, आणि त्याच्या आत्म्याच्या वसतिस्थानाचं स्वर्गीय सुख घ्यायला, त्या क्षणीं अशा धडपडत जा. हाय—रे—दैवा ! ( त्याच्या पायांवर डोकं ठेऊन मरते. रत्नाकर प्रवेश करतो. )

**रत्नाकरः**—( घाबरून ) काय पहातो आहे मी हें ! अरेरे ! माझा प्रेमळ मित्र मला अखेरीस सोडून गेला ! दुष्ट मनोरमे, काय केलंस हें ! स्त्रियांच्या उज्वल कीर्तीला काळीमा फांसलास, आणि स्वतःच्या घराण्याचा बदलौकिक करून, परमेश्वरसमान पतीच्या रक्ताचा घोंट घेतलास ! ! आणि तो कां ? तर तुला छटेल सुख लाभावं म्हणून ! धिःकार असो, तुम्हा नटव्या स्त्रियांना ! नवऱ्याचा प्राण घेणाऱ्या अवदसे, परमेश्वर तुझ्या आत्म्याला केव्हांहि शांति देणार नाहीं. निष्ठुर दैवा ! जगापुढं हें एक चित्र खेळवलंस, एवढं बस् झालं; आतां यापुढं तरी हीं असलीं हिडीस आणि भयानक चित्रं खेळवूं नकोस, एवढीच तुला माझी प्रार्थना आहे.

**अंक ४ था समाप्त.**

# अंक ५ वा.

## प्रवेश १ ला.

[ स्थळ—फत्तेगडावरील तुरुंग. जयसिंग स्वस्थ बसलेला आहे. दोन सरदार पहाऱ्यावर आहेत. ]

जयसिंगः—( स्वगत ) दांडगा आत्मविश्वास आणि जोरकस प्रयत्न या जगांत काय करूं शकणार नाहीं !

पद—( चाल—'जगीं हतभागा' )

अचल पदाचा लाभ ध्रुवाला ॥ धृ० ॥ लाभे तैसा, विजय बालिका । तेज दश दिशां विलसे । रविसम दयिता ॥ १ ॥

रोहिणी, तुझ्या चातुर्याची तारीफ करावी तितकी थोडीच आहे. काय बेमालुम वेषांतर हें ! बाबांसारख्या संशयी माणसाच्या तीक्ष्ण नजरेंतूनही निर्विघ्नपणानं पार तरी कशी पडली हेंच समजत नाहीं. शिकारींत बाबांचा हिनं प्राण वांचविला, म्हणून बेसुमार छाप त्यांच्यावर पाडून ठेवली आहे. शाबास रोहिणी ! देशाला लागलेलं हें खग्रास ग्रहण आज तुझ्या एकटीच्याच अकलेच्या दानानं सुटणार आहे. हें सैतानी साम्राज्य धुळीला मिळवायचं सामर्थ्य या मनगटांत जिवंत असतांना तुझ्या सारख्या नाजूक बालिकेला, स्वतःच्या जिवावर उदार होण्याचा प्रसंग यावा ! परमेश्वराच्या कृपेनं, तूं हातीं घेतलेल्या कामांत पार पडलीस, म्हणून बरं झालं, नाहीं तर रोहिणी, आज तुझ्यावर केवढा प्रसंग गुदरला असता ! या कारस्थानाचा शेवट ही कोणत्या तऱ्हेनं पुढं करणार आहे, याचा कांहींच उलगडा होत नाहीं. कारस्थानाचा शेवट होण्याच्या अगोदर मला जर रोहिणी भेटेल, तर काय बहार होईल ! रोहिणी, रोहिणी, तुझं दर्शन या वेळीं मला नाहीं

का होणार ! ( हातांवर डोकें ठेऊन स्वस्थ बसतो. रोहिणी सेनापतीच्या वेषांत प्रवेश करते. पहारेकरी मुजरा करतात. )

रोहिणीः--( पहारेकऱ्यांना ) चला, बाहेर जाऊन बसा. मी इथं आंत आहें तोंपर्यंत कुणालाहि आंत सोडूं नका. ( पहारेकरी जातात. रोहिणी पुरुषवेष काढून जयसिंगाजवळ जाऊन उभी राहते. ) कां--कसं वाटतंय इथं ? बरं वाटतंय ना ?

जयसिंगः--( एकदम पाहून आश्चर्यचकित होतो ) कोण रोहिणी ? अहाहा, परमेश्वरा, आनंदाचा हा क्षण अगदीं चिरकालीन टिकूं दे. रोहिणी, अशी जवळ ये.

रोहिणीः--छेः छेः, लांब आहें मी, तेंच ठीक आहे; जवळ आल्यानं पितृसेवेंत नाहीं तर अंतर पडायचं !

जयसिंगः--रोहिणी, खरोखरच तुझा मी अत्यंत अपराधी आहें.

रोहिणीः--खरं काय ? डोकं आज ठिकाणावर नाहींसं दिसतंय ?

जयसिंगः--आतां माझं डोकं पूर्ण ठिकाणावर आहे. या जयसिंगाच्या जीवाचा आधार, सुखाचं धाम, आशेचें माहेर,--

रोहिणीः--पण, हो, हो, हो--

जयसिंगः--माझ्या नवजीवनाचा उगम, हृदयाचा प्रकाश, आतां सारं कांहीं तूंच आहेस.

रोहिणीः--बाई, बाई, बाई; आतां तर अगदीं वेड लागायची पाळी आली. अहो स्वप्नांत तर नाहीं ना ? हो, हो, स्वप्नच दिसतं आहे मला हें. ( हुश्श करून ) जागे व्हा, जागे व्हा लौकर.

जयसिंगः--जागा आहें, लाडके, अगदीं पूर्ण जागा आहें.

रोहिणीः--अगदीं वेड हो वेड. आतां काय करायचं बाई ?

जयसिंगः--आणखी किती थट्टा करून माझा अंत पहाणार आहेस ?

रोहिणीः--आतां अंत न पाहतां, या प्रेमी हृदयांत ही अशी जाऊन बसणार ?

जयसिंगः–अहाहा ! माझ्या प्राणा, आतां अपराधांची क्षमा करणार ना

रोहिणीः–जीवितेश्वरा, आतां क्षमा कुणी कोणाला करायची बरं ?

जयसिंगः–लाडक्या जिवा, आतां क्षमा तूंच करायचीस. खरोखर—

पद–( चालः–सुरसुखखनी. )

दिपविशी आजि गुणी बाला । अर्पिन कौतुक झेला ॥ धृ० ॥
तव तेजें ॥ भू–ओझें ॥ जाई सपदि विलयाला ॥ १ ॥ भाऊक
जन तव बनले । अखिल विश्व मनीं धालें ॥ बंदा हा ॥ झणीं
बनला ॥ बोल मृदुल बोलाला ॥ २ ॥

रोहिणीः–पुरे, पुरे झाली स्तुती अं—

पद–( चालः–'पानी भरेली'–ताल दादरा. )

बोल मुखींचा ॥ राहो सदा स्वरूपीं अशा ॥ नाथा ॥ धृ० ॥
भोळी ही अबला ॥ करि स्खलनाला ॥ द्या सदय कर आपुला॥
निर्बल जिव हा ॥ ना छेडि बालेला ॥ १ ॥

पुढल्या कार्याकारितां मला आतां इथून लौकर गेलंच पाहिजे.

जयसिंगः–खरंच, आनंदाच्या भरांत, तें सारं विचारायचं तसंच राहिलं. पण या कारस्थानाचा शेवट आतां पुढं कसा करणार आहेस ?

रोहिणीः–कसा करणार आहें, आणि काय करणार आहें, कशाला हवी आहे ही पंचाईत तुम्हांला ? आपलं स्वस्थ इथं हवा खात बसावं.

जयसिंगः–हं—

रोहिणीः–हो बरी झाली आठवण. येथून सुटण्याची व्यवस्था अगदीं नीट करून ठेवली आहे, पण सुटका होतां क्षणींच, स्वामींच्या मठापलीकडल्या मैदानांत आधीं तावडतोब या. ( पूर्ववत् वेष घेते. ) ठीक आहे. हा सेनापति शशांक आपली आतां रजा घेत आहे.

जयसिंगः–या, या बरं बायकी सेनापति शशांक—

रोहिणीः–हो, हो, असूं दे बायकी शशांक, पण तुरुंगांत नाहीं बसलें मोजीत शंभर अंक—( निघून जाते. )　　　　( पडदा पडतो. )

## प्रवेश २ रा.

[ स्थळः—रस्ता--रोहिणी कांहीं सरदारांसह प्रवेश करते. ]

रोहिणीः—सरदारहो, आणिबाणीचा प्रसंग यावेळीं अगदीं जवळ आलेला आहे. सगळ्या गोष्टी काल तुम्हाला मी समजून दिलेल्याच आहेत ( कानांत सांगते ) समजलांत सारं; आतां शब्दांची पुनरुक्ति करायलासुद्धां मला वेळ नाहीं. चला जा लौकर पुढं--पण हो, थांबा; देतों हा खलिता ताबडतोब त्या दीपसिंगाच्या हवालीं करा. दीपसिंगानं त्रिवेणी नदीच्या तीरालाच आपला तळ दिलेला आहे. चला जा लौकर— (खलिता देते)मठाच्या पलीकडल्या मैदानांतच द्वंद्व युद्ध होईल, महाराजांना घेऊन हा मी आलोंच. व्हा पुढं तुम्हीं. ( सरदार मुजरा करून जातात. ) अहाहा ! झालं, बहुतेक काम यशस्वी झालं. मानसिंगा, आजपर्यंत तूं कैक नांवाजलेल्या वीरांना, आपल्या कृष्णकारस्थानांच्या घाग्यांनीं गळफांस दिलास खरा, पण आज ही दीपसिंगाची वीरकन्या रोहिणी आपल्या अकलेच्या जोरावर, एका क्षणांत तुला धुंळीला मिळवून आपला बोल खरा करून घेईल. अहाहा ! ! खरोखर—

पद--( राग--भैरवी ताल केरवा. )

भाग्याचा काल आला ॥ देशाला आजला ॥ धृ. ॥ जे त्रस्त
जिवां मारी । गेले ते यमद्वारीं । शासन त्या प्रभु द्वारीं । देवाचा
न्याय हा ! ॥ १ ॥ [ जाते. पडदा पडतो. ]

---

## प्रवेश ३ रा.

[ स्थळ--स्वामीचा आश्रम. कांहीं साधु होमहवन करीत आहेत. जवळच एक गाय चरत आहे. मानसिंगाचे दोन सरदार प्रवेश करतात. ]

१ ला सरदारः--( साधूंना ) उठा; बंद करा हा धूर एकदम. सरकार स्वारी याच वाटेनं पुढं द्वंद्वयुद्धाला जात आहे. ( साधु स्तब्ध असतात. )

२ रा सरदारः--( जवळ जाऊन ) ए--मगरुर; कान फुटले कां तुमचे ? उठा येथून. ( साधूंना ढुसण्या देत ) ए--बदमाष, उठतां कीं हवे पाठीवर फटके ?

एक साधुः--कां बाबा विनाकारण त्रास देत अहांत ? आमच्यासारख्या निरुपद्रवी माणसांना छळून कोणत्या स्वर्गीय सुखाचा आस्वाद घेणार अहांत ? तुमचे सरकार जरी या वाटेनं जायचे असले तरी हा यज्ञ पुरा केल्यावांचून, आम्हीं इथून उठणं शक्य नाहीं. सरकार स्वारीला जायला, हवी तेवढी पलीकडं जागा आहे. जा त्रास देऊं नका आम्हांला.

१ ला सरदारः–
२ रा सरदारः– } अपमान ? भयंकर अपमान !

१ लाः—हरामखोरांनो, महाराजांच्या एकनिष्ठ सरदारांचा अपमान ? आणि तो सुद्धां दीड दमडी किंमतीच्या गोसावड्यांकडून ? साऱ्यांच्या जिभा एकदम छाटल्या पाहिजेत. (साधूंना ठोकतात. साधु स्तब्ध असतात.)

२ राः—काय बेरड आहेत पहा ! बेशरम बेरडांनो, बऱ्या बोलानं हा धूर एकदम बंद करा, नाहींतर प्राणाशींच गांठ आहे.

एक साधुः—दुष्टांनो, चालते व्हा येथून. आमच्या सहनशीलतेचा जास्त अंत पहाण्याचं साहस करूं नका. इहलोकच्या क्षणिक सत्तेच्या मोहाला बळी पडणाऱ्या अरेरावी अधिकाऱ्यांनो, तुम्हांला आमचा धार्मिक विधि बंद करायचा काय अधिकार आहे ? असल्या परम पवित्र धार्मिक विधींना, तुम्हीं जर आपल्या अरेरावी सत्तेनं पायाखालीं तुडवूं लागलांत, तर परमेश्वराला न्यायाचा कांटा लौकरच जास्त तीक्ष्ण करायला लागेल. तुमचा हा असुरी धिंगा न बघायला, आजच कांहीं परमेश्वर गाढ झोंपीं गेलेला नाहीं. परमेश्वराच्या पूजनाचा असा अपमान करणं, म्हणजे मृत्यूला तुम्हीं स्वतःच पाचारण करण्यासारखं आहे. जा, नीट सावधपणानं आपलं आयुष्य कंठा.

१ ला:–अस्सं काय ? ठीक आहे. आत्तांच्या आत्तां महाराजांच्या कानांवर हा वृत्तान्त घालून तुमचीं आंतडीन आंतडीं सोलून काढतों. पण ते पहा आलेच महाराज, युद्धाला जायला. [ मानसिंग; सेनापतीच्या वेषांत रोहिणी, रहीम, प्रताप वगैरे सरदार प्रवेश करतात. ]

रोहिणी:–हाच त्या स्वामीचा मठ सरकार. या मठाच्या पलीकडील मैदानांतच द्वंद्वयुद्ध खेळायची जागा ठरविलेली आहे.

मानसिंग:–ठीक आहे. पण हे कोण लोक आहेत इथं ? हा जाळ कसला आहे ? आणि कुठं आहे यांचा तो स्वामी.

रोहिणी:–गेला असेल लेकाचा कुठं भिक्षा मागायला ? ( सरदारांस ) काय रे, हाच बंदोबस्त वाटेंत केला वाटतं ?

१ ला:–या हरामखोरांना येथून जायला सांगितलं, पण असले मगरुर आहेत, कीं एक शब्दसुद्धां ऐकत नाहींत.

मानसिंग:–वा ! जिवंत कां ठेवलंत आत्तांपर्यंत हरामखोरांना ?

१ ला:–( स्वगत ) अपमानाची उणीव भरून काढलीच पाहिजे. ( उघड ) सरकार, दुनियेंत किती नीच वृत्तीचीं माणसं वावरत असतात, याचा मासला आपल्याला दाखविण्याकरितांच, यांना आम्ही जिवंत ठेवलेलं आहे. पुढं होणाऱ्या या द्वंद्वयुद्धांत, त्या हरामखोर दीपसिंगाला जय मिळावा, व आपल्याला पराजय—छे; छे; सरकार, ते शब्दसुद्धां मुखांवाटे उच्चारवत नाहींत; आणि तेवढ्याकरितां हे राजद्रोही बेरड परमेश्वराची आराधना करण्याकरितां इथं बसलेले आहेत.

रोहिणी:–( स्वगत ) काय या हरामखोरानं कुभांड रचलं हें !

मानसिंग:–अस्सं; या राजद्रोही हरामखोरांची या क्षणीं डोकीं चेचलीं पाहिजेत. ( स्वगत ) काय करूं ? जयसिंग तुरुंगांत

ठेवल्या दिवसांपासून, ही सारी दुनियाच बहकल्यासारखी झाली आहे. जिकडं पहावं, तिकडं प्रजेंत असंतोष दिसून एकतऱ्हेचा बेमुर्वतपणा दृष्टीस पडतो. जें कार्य हातीं घ्यावं त्याची पूर्तता अगदीं उलट प्रकारानं होऊन, निराशेच्या दारुण निशेप्रमाणं वृत्ति शून्य होते. पण असल्या तऱ्हेची घातुक वृत्ति मला आतां एका बाजूला सारली पाहिजे. त्या हरामखोर गोसावड्याचा हा मठ त्याच्या या शिष्यांसकट या क्षणीं मला उध्वस्त केलाच पाहिजे. ( उघड ) प्रताप, चल ये असा पुढं; ती बघ ती गाय समोर उभी आहे. समशेरीच्या पहिल्या फटकाऱ्यासरशीं, या गाईची गर्दन अशी सफाईनें उडव, कीं नेमकी ती या राजद्रोही बेरडांच्या होमकुंडांत जाऊन पडली पाहिजे. चल उडव लौकर.

रोहिणीः–( स्वगत ) एका हिंदूकडून आतां गाईचा खून होणार ! छेः छेः; परमेश्वरा, कां विनाकारण अंत पहातो आहेस ? देवा, प्रतापाला खून करायची बुद्धि देऊं नकोस रे ! ! ( प्रताप स्तब्धच उभा असतो. )

मानसिंगः–( रागानें ) प्रताप, स्वस्थ कां उभा आहेस ? चल उडव लौकर गर्दन.

प्रतापः–( त्वेषानें ) माफ करा सरकार. आज पर्यंत या प्रतापानं आपल्या स्वामीसेवेंत, इतकीसुद्धां कुचराई न करितां, आपली प्रत्येक आज्ञा अगदीं तळहातांवर झेलून ती शेवटास नेलेली आहे. पण सरकार, आज आपण मला हें काय सांगत अहांत ? साऱ्या दुनियेचं पालन पोषण करणाऱ्या, या पवित्र मातेचा मला खून करायला सांगतां ? जिच्या दुधावर आजपर्यंत माझ्या पिढ्यान् पिढ्या पोसल्या गेल्या, आणि जिच्या दुधानं या शरीरांतल्या रक्ताचा वाढावा झाला, असल्या या तेजोमय मातेचा मला खून करायला सांगतां ? सरकार, जिची पुण्याई इतकी जबरदस्त, कीं स्वर्गांतले तेहतीस कोटी देवसुद्धां, आपलं वैकुंठ सोडून, आत्म्यांना शांति मिळण्याकरितां, या माऊलीच्या शरीरांत वास्तव्य करायला धडपडतात; अशा यः

माऊलीचा गळा कापायला कोणता बेशरम जीव पुढं येईल ? या साधुलोकां-विषयीं आपला राग जरी या वेळीं अनावर झालेला असला, तरी पण आपण जातीनं हिंदुराजे अहांत ही गोष्ट विसरूं नका, मी आपल्या अन्नांवर वाढला गेलों आहें, म्हणून एकदांच कां, पण सहस्त्र वेळां, आपल्या पायांवर लोटांगण घालीन, पण आपल्या या गोवधाच्या असुरी आज्ञेला हा प्रताप त्रिवार धिःकारल्याशिवाय राहणार नाहीं.

मानसिंगः—( रागानें ) हरामखोर—खबरदार एक शब्द उच्चारशील तर. आज्ञा पाळलीच पाहिजे.

कांहीं सरदारः–( प्रतापाजवळ जाऊन ) अरे मूर्ख तर नाहींस ? राजाज्ञा मोडतोस ? वेडा कुठला.

प्रतापः–( सरदारांस ) बेशरम जनावरांनो, खबरदार तरफदारी करायला जवळ याल तर. राजाज्ञाच काय, पण प्रत्यक्ष स्वर्गांतून परमेश्वर जरी या वेळीं खालीं उतरला, तरी त्यालासुद्धां या बाबतींत हार खावी लागेल. सरकार, प्राण गेला तरी बेहेत्तर आहे, पण या तुमच्या सैतानी आज्ञेला हा हिंदमातेचा छावा, पुन्हां त्रिवार, धिःकार, धिःकार करीत आहे. उडवा माझी गर्दन, या क्षणीं ही समशेर फेंकली. ( समशेर फेंकून देतो. )

मानसिंगः–अस्सं; चल हो मरायला तयार.

प्रतापः–गोमातेकारितां, निधड्या छातीनं मरायला हा प्रताप तयार आहे.

मानसिंगः–हरामखोर—( छातींत गोळी मारतो. तो घायाळ होऊन खालीं पडतो. )

प्रतापः–( मरतां, मरतां ) हाय ! अन्याय ! रहीम, माझ्या दो–स्ता, तूं मुसलमान आहेस खरा, पण या गा–ईला मारूं नकोस. [ मरतो. ]

रोहिणीः–(स्वगत) मातेकरितां प्राणत्याग करणाऱ्या महात्म्या, ईश्वर तुझ्या आत्म्यास शांति देवो. ( उघड ) काय हट्टी होता, सरकार ! फुकट मेला.

मानसिंगः—पाजी हरामखोर, तत्वज्ञानाच्या गप्पा सांगतोस काय ? साऱ्या बेरडांचा आज समाचार घेतों; कुठं आहे तो रहीम ? ( रहीम पुढें येतो. ) चल, झटपट उडा दे गर्दन, नहिं तो तेरी गर्दन उडाऊंगा. (रहीम स्तब्ध उभा राहतो.)

रोहिणीः—( स्वगत ) परमेश्वरा ! काय खेळ मांडलास हा ! या वेळीं स्वामी इथं येतील, तर काय बहार होईल !

मानसिंगः—रहीम, क्यौं देर कर रहां है ?

रहीमः—( स्वगत ) या अल्लाह ! अब मैं क्या करूं ? ( प्रतापाच्या प्रेताकडं पाहून ) हाय ! ये मेरा दोस्त मुफ्त मरगया ! ( उघड ) नहीं, सरकार मैं आपनी समशीर, इस गरीब गायपर नहीं उठा सक्ता.

मानसिंगः—क्यौं जिद् बढाता है, वेवकूफ ? जो हालियत ऊस बेअकली प्रतापकी कीगई, वह तेरी होगी. चल उडाव फौरन.

रहीमः—माफ की जी है सरकार—

" क्या पुण्य है, इसमे समाया; जान मैं सक्ता नहिं ॥
और हुक्म भी सरकारका; बस् मान मैं सक्ता नहिं ॥
जिस वास्ते है दोस्त मेरा; मुफ्त में मारागया ॥
मर भी जाना शौकसे; येहि पढाकर दोस्त गया ॥ "

मानसिंगः—रहीम, वह पागल हिंदू था, गोभक्त था; लेकीन् तुझे क्या उज्र है ? तूं मुसलमीन है ना ? फिर उडाव फौरन.

रहीमः—सरकार, मुसलमनिको आप क्या समझते हैं ? क्या किसीकी मुफ्त जान लेनेवालेको आप मुसलमीन समझते हैं ? क्या आप मुसलमीनको बेपीर, खुदाको भुला हुवा, एक जंगली आदमी समझते है ? मैं मुफ्त किसीकी जान क्यौं लूं ?

मानसिंगः–( खवळून ) मुफ्त ? किसीकी जान मुफ्त क्यौंलूं ? रहीम, मेरे हुक्मके लिये. तेरा मझहबभी, तुझे, गायकी जान लेनेके लिये मना नहीं करतां; इस्लीये कहरहा हूंके झटपट उडादे गर्दन वर्न तेरी गर्दन उडादी जायेगी. मै तिसरी बार ये कहरहां हूं—

रहीमः–सरकार, आप तीसरी बार कहरहे है, के मैं एक गरीब गाय, मुके जानवरकी जान लूं ! ! मेरे ये दोस्तको गाय बहोत प्यारी थी; और मुझसेभी गायने कुछ दुःश्मनी नही की ही है ! गाय की जान लेनाहि चाही है, ऐसा मेरा मझहब भी मुझे नही सिखाता. मेरा दोस्त ! ! हाय ! मेरे दोस्तने गाय न मारनेके वास्तेहि जान दिही है; और सरकार, मैंभी तय्यार हूं; यह लीजिये आपकी समशीर, मैं गायकी गर्दनपर हरगीज नहीं उठा सक्ता. सरकार—

“ बेगुना हो के लिये, गर आपकी समशीर है; ॥
काटलो सर बेखतर, मुझको न कुछ इन्कार है. ॥ ”

मानसिंगः–सच है; मै जानताहूं के तेरी मौत, अब तेरे सरपे खडी है. रहीम, मेरे हुक्म को गर्दन न झुकाना, कुछ मामुली बात नहीं है. तेरे बदनसीबपर खाली मुझे हंसी आती है; रहीम, फिरसे एकबार कहता हूं, के इस गायकी गर्दन जलदी उडादे, और आपनी गर्दनपर गदा न ला.

रहीमः–सरकार, आपकी अक्ल इस वक्थ फरार हो रही है, इतनाहि नही, तो आपको उंचे चक्करपर चढा रहीहै; वर्न आप एक हिंदू महाराजा होते हुवे, एक हिंदूको, गाय न मारा, इस गुन्हेके लिये, मुल्के आदमको पहूंचाया, और मुझ मुस्लीमको भी फर्मारहे है, के गाय की जान ले. खैर; सरकार आप मुझे मत डरायें—

